


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# दीपावली

साहित्य-कला-सङ्गम

• • • • • • • • • • • • • • • • •



नोव्हेंबर
१९६३
वर्ष १९ वें

## श्रेयनामावलि–






दलाल आर्ट स्टुडिओ : ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५

Gram:– DALALART

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींही अधिकृत मतें असतातच असें नाहीं.* प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.




अनुक्रमणिका

# दीपावली

## दलाल आर्ट स्टूडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोनः ७७७६५  तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु.१२–५०न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

---

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# दीपावली वार्षिक अंकानंतर....

**दिवाळी** आली नि गेली सुद्धा. मात्र दिवाळीच्या निमित्तानें बाहेर पडलेले नियतकालिकांचें दिवाळी अंक वाचक अजून वाचताहेत तर कांहींचे वाचून हातावेगळे झाले आहेत. जेमतेम अंक वाचूनसुद्धां झाले नाहींत तोच वाचकांचे अभिप्राय आमच्याकडे येऊ लागले आहेत. ही आनंदाची गोष्ट.

यंदा दीपावलीचा वार्षिक अंक रसिक वाचकांसमोर ठेवतांना परिश्रमांची पराकाष्ठा करावी लागली. त्यांच्या अभिरुचीला रुचणारी विविधता आणण्याची आमची सर्वतोपरि शिकस्त चाललेली असतेच. वाचकांची आवडनिवड नजरेसमोर स्थिरावताच मात्र एक भीति मनांत घर करून असते. वाचकांना नेमके काय रुचेल ह्याचा सही अंदाजा लावणें, मेरु पर्वत हलविण्याइतकेच जड असते. तरी पण दीपावलीचा वार्षिक अंक सर्वतोपरि सर्वांगसुंदर करण्याचा व रसिक वाचकांसमोर ठेवण्याचा प्रयत्न आम्ही निष्ठेने केला आहे.

दीपावलीचा अंक वैशिष्ट्यपूर्ण व उत्कृष्ट साहित्य व चित्रें यांनी नटलेला–सजलेला आहे, अशा प्रकारचा सुज्ञ वाचकांनीं शेकडो पत्रें पाठवून आपला अभिप्राय व्यक्त केलेला पाहून आमचें परिश्रम सार्थकी लागल्याचे समाधान गवसते. आनंदाची कूस अधिक दुणावते, उत्साह फोफावतो व नव्या धाडसांचें व प्रयत्नाचे बळ अंगांत संचारतें.

एकंदरीत पत्रांचा मागोवा घेता दीपावलीच्या वार्षिक अंकांतील '**वसुंधरेचें स्तन्य उसळलें**' या भारतीय संस्कृतिरूपधारित नग्नांवरील बहुरंगी चित्रमालिका तर सर्वच वाचकांना फार आवडल्याची दिसली. यंदाचा नवीन उपक्रम म्हणजे पानांची दुरंगी व्यंगचित्रमालिका 'चालु जमान्यांत साजरें झालेलें **भारतीय दिव्य महोत्सव**' 'आंतरभारतीय प्रेमा तुझा रंग असा' या तर एवढ्या गाजल्या कीं अनेक वृत्तपत्रें व वाचकांनीं त्याचें फार कौतुक केलें. कित्येकांना 'लेखकांच्या नाना कळा' व 'रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग' ही कल्पक व्यंगचित्रमालिकाहि भारीच आवडेलली दिसते. साहित्याबद्दल तर सर्वच वाचकांची मतें रुचकर आहेत. श्री. पु. ल. देशपांडे यांचा 'मी आणि इतर पाळीव प्राणी प्रामुख्याने कुत्रा', श्री. पु. भा. भावे यांची 'आला क्षण गेला क्षण' श्री. अरविंद गोखलेंची 'शपथ', डॉ. कु. दमयंती सरपटवारांची 'अश्वमुद्रा', श्री. आनंद साधले यांचे 'वसुंधरेचें स्तन्य उसळलें' हे भाष्य, श्री. वामन चोरघडे श्री. श्रीराम कामत, श्री. गोपाळ कृष्ण भोबे, श्री. बाळ सामंत आदिंची साहित्य निर्मिती तर सुंदर व सकस असल्याचा उत्तम अभिप्राय आहे.

आमच्या असंख्य रसिक वाचकांनीं दीपावलीचे जें अमाप व उत्साहपूर्ण स्वागत व कौतुक केलें त्याचा विसर पडणें शक्यच नाहीं. त्यांच्या या प्रोत्साहनामुळेंच आज नव्या हुरुपाने पुनश्च हरी ॐ करीत आहोत. नवें नवें प्रयोग करण्याचा व अनुकरणशील आविष्कार घडविण्याचें नवें धाडस ज्या वाचकांच्या सहकार्यामुळेंच आम्हाला येतें त्या सर्व वाचकांचें आम्ही पुनश्च आभारी आहोंत.

आज आमचा वाचक वर्ग वार्षिक अंक वाचण्यांत गर्क असल्यामुळें इतर कुठलेहि किरकोळ अंक वाचण्याच्या मनःस्थितित तो नाही. म्हणून प्रस्तुत अंक बेताचाच काढावा लागत आहे तो खंड न पडावा म्हणून. तरी वाचक रुसणार नाही अशी खात्री आहे.

डिसेंबरचा अंक मात्र नेहमीप्रमाणें १ तारखेला नव्या आकर्षणासहित व अधिक पृष्ठांसहित प्रसिद्ध करीत आहोत याची जाणीव वाचकांनी असूं द्यावी.




स. न. वि. वि.

'दीपावली'चा दिवाळी अंक बहुतेक वाचून झाला. अंकाचें बाह्यांग आणि अंतरंग दोन्हीहि सुंदर आहेत. 'दीपावली' हें रसिकांचे आवडतें मासिक आहे. 'वसुंधरेचें स्तन्य उसळलें' ही चित्रमाला रसिक मनाला भुरळ घालते. अभूत-पूर्व आनंद देते व विलक्षण समाधान देते. 'व्यंगचित्रमालिका' दंभस्फोट प्रभावीपणें करतात. पु. ल. देशपांडे यांच्या पाळीव प्राण्यांपासून माणसांना पुष्कळ शिकतां येईल. गोपाळकृष्ण भोबे यांचें लेखन मला नेहमींच आवडतें. 'तस्करा हातीं'मध्यें एका आगळ्या पैलूचें दर्शन घडतें. शिरीष पै यांची कथा नाविन्यपूर्ण आहे. भावे, गोखले, चोरघडे आघाडीवर आहेत. विजय तेंडुलकरांची आगळी कथा आवडली. 'उंच माणसें' लक्ष वेधून घेतात. 'स्वयंवरां'त मन सुखावते. जयवंत दळवी, सबनीस, ओक, सामंत यांच्या विनोदी फवाऱ्यांनीं मन ताजेतवानें होतें. असा भरदार अंक सादर केल्याबद्दल हार्दिक अभिनंदन.

आपला,
**श्री. के. देवधर**
झावबावाडी, मुंबई

स. न. वि. वि.

अंक छान काढला. चित्रें यंदा तुम्ही कोणती देणार त्याची पंचाईत होती. कारण बहुतेक चांगले विषय तुम्ही चितारून टाकले आहेत. त्यामुळें हा अनपेक्षित धक्का व आनंद वाटला. तुमचें मनःपूर्वक अभिनंदन.

आपला,
**मधुकर केचे**
अमरावती

स. न. वि. वि.

वैभवशाली दिमाखांत नाविन्यपूर्ण साज-शृंगार केलेला 'दीपावली'चा वार्षिक अंक काल मिळाला. अंक पातळ असला तरी पातळी उंचावलेली आहे. हें जाणवलं. खरं सांगायचं तर हा एक अंक चाळला आणि सगळे दिवाळी अंक चाळल्याचं समाधान लाभलं. (छपाईत मारून नेणारा 'मौज' सुद्धां!)

आपणां सर्वांना व 'दीपावली'ला दिवाळी सुखसमृद्धीची जावो हीच सदिच्छा. कळावें.

आपला,
**दि. श्री. कराडकर**
मुलुंड, मुंबई ८०

स. न. वि. वि.

'दीपावली'चा दिवाळी अंक मी दरवर्षी कटाक्षानें घेत असतो. अर्थात् यंदांचाहि घेतलाच. तुमचीं चित्रें छान आहेत, हें खरें म्हणजे, मुद्दाम लिहायला नको. पण 'तपस्विनी गंगा' मला सर्वोत्कृष्ट वाटलें, सर्वांत अधिक आवडलें! शां. शं. रेग्यांच्या 'नाना कळा' चुरचुरीत आहेत आणि अर्थात् त्यासोबतची चित्रेंहि! 'दिव्य महोत्सव'हि झकास जमलेत. पु. ल. चा लेख मजेदार आहे. बाकीचं अजून वाचतों आहे. (नाहींतर वर्तमानपत्री परी-क्षणाची कळा, या पत्राला यायची!) सुरेख अंकाबद्दल तुमचं अभिनंदन–मनःपूर्वक अभि-नंदन नवें. वर्ष तुम्हाला–'दीपावली'ला–सुख-समृद्धीचे जावो, हीच शुभेच्छा!

स्नेहांकित
**नरेंद्र बल्लाळ**
विलेपार्ले, मुंबई

स. न. वि. वि.

दरवर्षाप्रमाणें याही वर्षी आपण 'दीपा-वली'चा अंक प्रसिद्ध केला त्याबद्दल धन्यवाद. 'वसुंधरेचें स्तन्य उसळलें' ही चित्रमाला फारच रसपूर्ण वाटली. या जलवाहिनींची भावस्वरूपें साकार करायला आपल्यासारखा प्रतिभावंतच हवा यात शंका नाहीं. आपल्या प्रतिभेचे हे नवनवोन्मेषशालित्व पाहून दरवेळीं मन थक्क होते.

आपला
**प्रा. भय्यासाहेब ओंकार**

स. न. वि. वि.

नुकताच आपला दिवाळी अंक वाचून संपवला आहे. तसे इतरहि अंक वाचलेत, जेवढे कांहीं वैशिष्ट्यपूर्ण अंक गणले जातात ते तर आपलें वैशिष्ट्य राखून आहेतच. तरी पण आकर्षकतेच्या दृष्टीनें मला 'दीपावली' विशेषेंकरून आवडला. ही निव्वळ स्तुति नव्हे तर ती वस्तुस्थिति आहे.

अंक एकदम वाचावासा वाटला तो त्याच्या सुंदर व सुबक छपाईमुळें. आंतील भारतीय नद्यांवरील रंगीत चित्रें तर इतकी अप्रतिम आहेत कीं प्रत्यक्ष नद्याच मानवी रूप धारण करून 'दीपावलींत' उतरल्या कीं काय, असा भास क्षणभर झाला. इतर कुठल्याहि दिवाळी अंकांत अशा अव्वल दर्जाच्या तोडीची रंगीत चित्रें नाहीतच मुळीं. हे माझें प्रांजळ मत. सरस्वति, गोदावरी व नर्मदा तर अविस्मरणीय.

'आंतरभारती प्रेमा तुझा रंग असा' 'दिव्य महोत्सव' 'रात्रं दिन आम्हां युद्धाचा प्रसंग' व 'लेखकांच्या नाना कळा' ह्या व्यंगचित्रमालाहि कल्पकतेचा व प्रत्यक्ष आविष्काराचा उत्तम नमुना म्हणावा लागेल. साहित्य तर उत्तमच आहे, याबद्दल वाद नाहीं. साहित्याची ठेवण-सुद्धां सर्व थरांतल्या लोकांना आवडेल अशीच करण्यांत आली. एकंदरींत अंकाचें अंतरंग व बाह्यांग या दोन्ही दृष्टीनें सर्वांगसुंदर अंक काढल्याबद्दल दीपावलीचें अभिनंदन!

आपला,
**यशवंत ग. भावे**
पुणें–२.


दिवाळी अंकाचा एक वाचक!

*त्यानें तिला तिचें नांव विचारलें, तेव्हां ती एकदम दचकल्यासारखी झाली. कुठेतरी ओरखडा निघाल्यासारखं वाटलं आणि तिचें सर्व अंग शहारलें...*

# छळ

—श्रीपाद काळे

थरथरत्या हातांत कपबशा घेऊन शरयू बाहेर आली. तिच्या वडिलांनीं तिच्या हातांतल्या डुचमळणाऱ्या कपबशा घेतल्या, आणि बसलेल्यांच्या पुढ्यांत ठेवल्या. शरयूनं एकदां वर बघितलं. लोहचुंबकाला एखादी लोखंडाची वस्तू येऊन चिकटावी, तसे समोर बसलेल्यांचे चेहेरे तिच्या मनावर चिकटले. पश्चिमेकडच्या खिडकींतून सायंकिरणाच्या रेषा आंत आल्या होत्या, त्यांतली एक रेषा तरण्याशा माणसावर पडली होती. त्याचा चेहेरा राठ दिसत होता. काळा करपल्यासारखा वर्ण आणि बारीक केलेले उभे केस, डोळ्याच्या राठ भुवया—आणि निर्विकार ओठ. हाताचीं थिटीं बोटें—बंद गळ्याचा शर्ट—शरयूला वाटलें, या माणसानें हे कपडे उपरे घातले आहेत, आणि त्याचें अंग आक्रसल्यासारखें झालें आहे...शरयूनें पुन्हां वर पाहिलें, तेव्हां दातांत अडकलेलें कांहींतरी काढण्याचा त्याचा प्रयत्न चालला होता, त्यामुळें त्याचं तोंड वेडेंवाकडें होत होतें—जेव्हां त्यांच्या जिभेला इछित वस्तू मिळाली, तेव्हां त्यानें स्वच्छ बैठकीच्या कोपऱ्यावर थुंकल्यासारखें केलें. चहा पितांना सुद्धां त्याचें तोंड पचापच वाजत होतें. त्यानें जेव्हां शरयूला नांव विचारलं, तेव्हां ती एकदम दचकल्यासारखी झाली. कुठेतरी ओरखडा निघाल्यासारखा वाटला आणि तिचें सबंध अंग शहारल्यासारखें झालें...त्या माणसाचें बोलणेसुद्धां राठच होतें. तशाच शब्दांनीं तो प्रश्न विचारत होता... स्वयंपाक करतां येतो कां विचारलें, शेतीभातीची माहिती आहे का विचारलें, शरयूकडून उत्तरें आल्यावर दुसरा म्हातारासा गृहस्थ म्हणाला, 'जा तूं आंत—'

—शरयू रित्या कपबशा घेऊन आंत आली आणि तिनें एक सुस्कारा टाकला...मग तिला कळलें, त्या राठ वाटणाऱ्या तरुणाकरतां तिला दाखवली होती—तिच्या वडिलांनीच तिला मागून आंत येऊन हें सांगितलें—त्या तरुणाबद्दल तिनें बरेंचसें ऐकलें होतें. त्याचे वडील त्याच्या लहानपणीं वारले, तेव्हां त्याच्या बाप्याला कर्ज होतें. तो मोठा होत गेला, त्यानें खूप कष्ट केले आणि कर्ज फेडलें. भरीचशीं जमीन तो स्वतः कशीत होता. आंब्यांचा, खतांचा व्यापार करत होता. त्याचा सावकारीचा व्यवहारही होता. वडिलोपार्जित पडायला आलेलें घर त्यानें दुरुस्त केलें होतें आणि आतां तो लग्नाला उभा राहिला होता. चांगला हुंडा देणाऱ्या मुलींचे बाप त्याच्याकडे खेटे घालूं लागले होते—शरयू त्याला पसंत पडली, तर शरयूचें नशीब उजळणार होतें—

शरयू गेले आठपंधरा दिवस सारखें सारखें हेंच ऐकतच होती...तिच्या वडिलांचा जीव धपापत होता. एकदां शरयूला त्यानें पसंत म्हटलें, कीं त्या गरीब माणसाच्या छातीवरचें ओझें कमी होणार होतें—सध्याच्या परिस्थितींत तो कसा जगत होता हेंचं कळत नव्हतें. शरयूची आई गेलीं दोन—तीन वर्षं जवळ जवळ

अनुक्रमणिका

अथरूणालाच खिळून होता. शरयू ही त्यांची थोरली मुलगी. लग्न झाल्यापासून परिस्थितीचें हें असें तोळामासा चाललें होतें—शरयूला लहानपणापासून तिच्या मोठ्या मावशीनें वाळगली. थोडें इंग्रजी शिक्षण झालें आणि मावशीच्या अडचणीकरतां शरयूला शाळा सोडावी लागली. शरयूचा आवाज छान होता. तिच्या मावशीच्या नवऱ्याला गाण्याची चांगली माहिती होती. त्यानें शरयूला पेटी वाजवायला शिकविलें. वास्तवीक शरयूचें लग्न मावशीकडेच व्हायचें. मावशीकडे दुजाभाव माहीत नव्हता. शरयू मावशीला मावशी म्हणे, म्हणून मावशीचीं मुलेंहि आईला मावशीच म्हणूं लागलीं होतीं. पुढें मावशी वारली. तिचे मोठे मुलगे कामा- धंद्याकरतां पांगले आणि एक दिवस शरयू बापाकडे आली—शरयूला विसावें वर्ष संपलें होतें—ती बापाकडे आली—ती आली म्हणून बापाला वेळेवर शिजलेलें अन्न मिळूं लागलें—ती स्वयंपाक पाण्यांत हुषार होती. मग गेल्या वर्षी तिनें शेतीकडे लक्ष घातलें. पुरुषाला ओशाळें वाटावें, असें काम ती ओढूं लागली—बाप झुरत होता. ही काळीसावळी पोर एकदां स्वतःच्या घरीं केव्हां जाते, याची झुरणी त्याला लागली होती...दहाबारा ठिकाणीं खटपट, करून तो थकला होता. मोटार भाड्याच्या पैशासाठीं सुद्धां त्याचा जीव कासावीस व्हायची वेळ येई—लग्न ठरलें, कीं एका शेताच्या तारणावर दोनशें रुपये द्यायचें एकानें कबूल केलें होतें—शरयूच्या बापानें एवढीच व्यवस्था करून ठेवली होती. ही व्यवस्था करताना त्या माणसानें मागचांपुढचा विचारहि केला नव्हता. शरयूचीं पाठचीं भावंडें होतीं. स्वतःला पोट होतें—बायको आजारी होती.

—ही परिस्थिती शरयूला कळत होती. स्वभावाची ती लहानपणापासूनच अबोल. दुखले खुपलें तरी मनांतल्या मनांतच ती कळ दाबायची. आपल्याकडे गोरेंगोमटें रूप नाहीं—शिक्षण पुरें नाहीं —हेंही तिला ठाऊक होतें—जेव्हां बापानें तिला विचारलं, 'तुला कसें काय वाटतें हें स्थळ?' तेव्हां ती खालीं मान घालून म्हणाली, 'तुम्हीं काय कराल, तें माझ्या हितासाठीं—'

—पश्चिमेकडच्या खिडकींतून आलेल्या उन्हाच्या एका लांब रेषेंत तिनें जेव्हां त्या तरण्याशा माणसाला बघितलें, मग चरे गेल्यासारखे त्याचे शब्द ऐकले—त्याचीं थिटीं बोटं बघितलीं तेव्हांच शरयूच्या मनानें धास्ती घेतल्यासारखी, झाली होती. लग्नांत जेव्हां ती त्याच्या जवळ बसली, ती सुद्धां अंग चोरलेल्या मांजरीसारखी. विवाहहोमाच्या ज्वाळेंत त्याची थिटीं बोटें बघून तिला डोळे मिटावसें वाटत होतें. आईबापांची सुटकेची अवस्था बघून तिनें आपलें मन मारलें होतें—या माणसाशीं कशाही परिस्थितींत संगम करण्याचें तिनें ठरवून टाकलें होतें—त्यानें थिट्या बोटांच्या एका मुठींत तिला चिरडून टाकायचें म्हटलें, तरी आता अंग स्वाधीन करायची तिची तयारी होती—

—शरयू स्वतःच्या घरीं आली—आतां तिचें स्वतःचें झालेलें घर काहींसें खेड्यांत होतें. एस. टी. जात-येत होती, म्हणून लोकांच्या लक्षांत तें गांव येत होतें. एका ओळींनं लहान लहान घरें होती— त्यांतल्या एका उभ्या चिरोळींत तिचें बैठें घर होतें—आंत काळोख होता. विहिरीवर एक जास्वंद होती आणि एक तगर होती. जवळच एका भाऊबंदाचें मोठें माडीचें घर होतें—पण शरयूला कळलें, कीं त्यां भाऊ- बंदाकडे जाणे-येणें नाहीं, या घरांतल्या माणसांनीं तिकडे बघायचें सुद्धां नाहीं. दिगंबरची आणखी गावांत बरीच वाकडी होती. कोणाचें कोंबडें चुकून परसांत आलें तर त्याची मैना



अनुक्रमणिका

मुरगळून टाकत होता. शरयूची सासू शरयूनें लग्नांतच पाहिली होती. पांढऱ्याफट तुरळक केसांची अस्ताव्यस्त देहाची. एकटी एकटीच स्वतःची पुटपुटणारी ती बाई. लग्नांत तर ती सारखी धुसफुसत होती. लुगड्याकरतां शरयूच्या बापानें दहाची नोट पुढें केली, तेव्हां ती कपाळाला आठ्या घालून आणि डोळे बारीक करून म्हणाली होती, 'ही नोट का मी नेसूं ?'

–शरयू घरांत आली, तेव्हांच तिनें घरांतलें सारें काम शरयूच्या स्वाधीन केलें होतें–ही मुलगी पत्करताना तिनें मुलाला मुळीं स्वच्छच सांगून टाकलें होतें, तिला सगळें काम नीट येतें कीं नाहीं, याची पुरती चौकशी कर– शेतीभातींत ओणवायला पाहिजे–अंगानें दणकट हवी–आणि तिला शरयूबद्दल विश्वासाचें कळलें होतें. तिला हवी तशीच ती मुलगी आहे. म्हणून तिनें हुंड्याचा, फारशा मानापमानाचा त्याग केला होता. हा त्याग करतांना तिचा जीव कासावीस झाला होता. पण तिनें तो पत्करला होता. शरयूच्या सुरवातीच्या दहा-पंधरा दिवसांत ती फार जपली होती. शरयू आणि दिगंबर साधारण एके ठिकाणीं येणार नाहींत, बोलणार नाहींत, याकरतां ती फार सावध रीतीनें वागत होती. दिगंबरचें पान तीच वाढत होती. त्याला हवा असलेला कमी दुधाचा चहा उठवत नसलें, तरी उठून करून देत होती. दिगंबर एकदां तिच्या नादाला लागला असता, कीं मग त्याला आवरणें कठीण जाणार होतें–आपल्या मतानें शरयूची सासू फार दूरदर्शीपणानें वागत होती–अशी वेल सोडलेलीं मुलें मग आईला विचारत नाहींशीं होतात–याचवेळीं जपायला हवें–जपायला हवें—

—एक दिवस दुपारीं शरयू विहिरीवर धुणी धुत होती, आणि दिगंबर कुठून तरी बाहेरून आला होता. पाय धुवायला तो विहिरीवर गेला –शरयूनें त्याच्याकडे बघितलें–आणि नाहीं म्हटलें, तरी तिचें सर्वांग पुलकित झाल्यासारखें वाटलें–त्यानें आपल्या ओरखाडा निघावा, त्या आवाजांत तरी कांहीं बोलावें, असें तिला वाटलें–मनांत कुठेंतरी भीति कोपरा धरून असली, तरी नातें निर्माण झालेलें आहे–तो पाय धुत होता...आणि शरयूच्या मनांत मावशीचा थोरला मुलगा लग्न झाल्यावर कसा वागला होता, हें आठवत होतें. दारापाठीं बायकोचा धरलेला हात शरयूनेंच पाहिला होता आणि मग त्याची उडालेली गडबड-आणि लाल झालेली वहिनी—

'काय ऊन पडलें आहे' दिगंबरकडे न पहातांच शरयू म्हणाली.

—दिगंबरनें आभाळाकडे मिचमिचे डोळे करून पाहिलें. हातांतला पिळा तसाच धरत ती म्हणाली, 'इथें उघड्या जागेवर फुलझाडें छान होतील—'

'काय ?'

'फुलझाडें लावावी म्हणते—'

'गुरें एकतरीं ठेवतील का ?—'

'कुंपण करून घ्यायला हवें—'

'समजलं–असले धंदे करायला वेळ नाहीं. फुलें माळून नायकिणीसारखें कुठें जायचें आहे.' त्याच्या राठ भिवयाकडे शरयूनें भीत भीत पाहिलें. तो एकदम असा हमरीतुमरीवर येईल, असें तिला वाटलें नाहीं. मग ती गप्प बसली. दिगंबर उन्हाकडे बघत मनांत म्हणाला, नवऱ्यापेक्षां थोड्या जास्त शिकलेल्या बाय-कांना वेळीं असें दाबांत ठेवायला हवें. दोन टांगेत तो घरांत आला, आणि आई जवळून त्यानें चहा मागून घेतला.

—लग्न झाल्यावर पहिल्या दहापंधरा दिवसांतच पाऊस सुरू झाला. सकाळीं झिम-झिम पाऊस पडूं लागला. मृदुगंध दरवळला करपणारें पेटणारें, वातावरण शांत...शांत झालें–आणि अजाणतां शरयूच्या तोंडांतून एक लकेर बाहेर पडली. पाखरानें उंच उंच जावें–आणि दंवबिंदूनें वेलीच्या आधारानें खालीं यावें–तशी शरयूची लकेर वर गेली, आणि खालीं आली–तिंची सासू तेव्हां अंग धुत होती–डोळे फाडून फाडून शरयूकडे ती बघूं लागली. न्हाणी खालीं झालेला धूर घशांत घेण्याचें पत्करूनहि ती किंचाळल्यासारखी ओरडली, 'हां–हां घर आहे हें–काल आलेली लग्न झालेली सासुरवाशीण तूं–जनाची नाहीं तरी मनाची लाज धर—'

× × ×

श्रावणांतली एक संध्याकाळ होती. आश्लेषा नक्षत्राचा पाऊस सळसळत होता. सायंकाळची कोंवळीं उन्हें चकाकत होतीं. दरवाजाच्या कडेचा वाकलेला लहानसा पण डेरेदार आंबा सुस्नात होऊन गेला होता. अवघडलेला एखादा पावसाचा थेंब लबाडासारखा हंसत होता. वरच्या विखुरलेल्या काळ्या ढगावर सोनेरी किनार चमकत होती. अंगणांत दोन लहान चिमण्या उतरल्या होत्या. रोज संध्याकाळीं उघाडीच्यावेळीं अशाच त्या खालीं उतरत, आणि तिन्हिसांजा झाल्या, कीं आंब्याच्या मोठ्या पानांआड एकमेकांना बिलगून रात्र काढत. शरयूला हें माहीत होतं–दोन लहान चिमण्या खेळत होत्या. हितगुज केल्यासारख्या चिवचिवत होत्या. एकमेकांच्या चोचींत चोंच घालत होत्या–वरचे ढगावर किनार करणारें ऊन, अंगणांतल्या चिमण्यांचा खेळ–पाना-खालीं ओथंबलेला लबाडथेंब–शरयू भान हरपल्यासारखी पहात होती–उन्हें मंद मंद होत असल्याचें, बैठ्या घरांत काळोख पसरत असल्याचें तिच्या लक्षांत येत नव्हतें–तिच्या सासूनें जेव्हां तिचे दोन्ही खांदे घुसळले, तेव्हां ती भानावर आली–मग तिच्या सावकाश लक्षांत आलें, हातांतली केरसुणी तशीच हातांत आहे. घरातली घागर–कळशी रिकामीच आहे–ती सावध झाल्यासारखी झाली आणि घरांत गेली.

सासू तिच्याकडे एकटक पहात राहिली. अलिकडे आपली सून अशी चमत्कारिक भारल्यासारखी कां वागते, तिला कळत नव्हतें–तिनें खोदून खोदून विचारलें होतें–भूक लागली कां, माहेरची आठवण येते कां–कीं आणखी तुला काय होतें आहे ? अशा प्रश्नाचा भडीमार केला, कीं शरयू नाहीं नाहीं म्हणायची. ओशाळी व्हायची. संध्याकाळीं अशीच बघत रहायची. गुरें आणायला सड्यावर गेली, तर गुरें केव्हांच परतून यायची, आणि किती वेळ हिचा मग पत्ताच नसायचा. गुरा-ख्यानं एकदां सांगितलं होतं, कीं ती नुसती फिरतच रहाते. रानफुलाकडे खाली वाकून पहाते—

–शरयूच्या सासूला शरयूचें हें लक्षण कांहीं ठीक दिसत नव्हतं...दिगंबरशीं सुद्धां एरव्हीं शांत, शहाणी दिसणारी ही सून तिळ्यासारखी वागत होती...अलिकडे सकाळीं उठल्यावर त्याचे डोळे लाल दिसत होते–तो घालूनपाडून बोलत होता–बोलतां बोलतां दांत चावत होता–आणि तिला सुद्धां हें पटत होतें. लग्नाच्या वेळीं भरल्या केळीसारखी दिसणारी ही मुलगी लग्नाला नुकतें वर्ष होऊन गेलें—आणि वाळत चालली आहे. शरयूच्या सासूला आपलें लहानपण आठवत होतें. लग्न झालें, तेव्हां ती बाराचौदा वर्षांची होती—तिची सासू भयंकर कजाग होती. वरींच वर्षें मूल होत नव्हतें, म्हणून तिनं स्वतःच्या सुनेला भरउन्हांत उभें केलें होतें. महिन्याच्या चार दिवशीं तिला अन्न घांतलें नव्हतें. दोनदां तिनदां तिला माहेरीं पोंचती केली होती, आणि एकदां 'दूध चोरून प्याय-ल्याचा' आळ घेऊन तापलेल्या उलथन्याचा







अनुक्रमणिका








अनुक्रमणिका








डाग दिला होता. नवरा मेल्यावर बरींच वर्षं म्हणजे दिगंबर मोठा होईपर्यंत तिनें छळून घेतलें होतें. ती मेली, आणि नंतर पिंडाला कावळा शिवला नव्हतो. शरयूच्या सासूला वाटलें–नक्की तिनं शरयूला झपाटली असली पाहिजे–एरव्ही कांहीं कारण दिसत नव्हतं. तिनं गावकराला सांगून कौल घेतला होता. तरीं त्याचा कांहीं उपयोग झाला नव्हता. चार आठ दिवसांनीं शरयू अशीच भान नसल्या सारखी कुठेंतरी पहात उभी रहात होती. एकसरीनं पडणाऱ्या पावसाकडेहि ती अशीच पहात होती. हांका मारल्या तरी जागीं होत नव्हती. चांगली दोन्हीं हातांनी तिला घुसळावी लागे. मग ती ओशाळी होऊन कामाला लागे. आतां चांगला पंचाक्षरी आणल्याशिवाय गत्यंतर नव्हतं. एरव्हीं ही गुणी सून दिवसा दिवसाला खंगत चालली होती.

—दिगंबर रोखल्या डोळ्यानें शरयूकडे पहात होता. त्याचे बारीक केलेले उभे केस, दाट भुवया, थिटी बोटें–त्यानें डोळे लाल केले कीं शरयूची जीभ आंत खेचल्यासारखी होत होती. तिला अंग चोरतांना नाकीनऊ येत. डंख धरल्यासारख्या कांहीं रात्री दिगंबरला आठवत होत्या. रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या त्याला झोप लागली होती. जेव्हां एका झोपेवरून त्यानें पाहिलें, तेव्हां शरयू जाग्यावर नव्हती. बाजूचा बाहेर जायचा दरवाजा उघडा होता. तो तसाच उठला होता. बाहेर मोकळें चांदणे पडलें होतें–तो तिरमिरीनें बाहेर आला होता. तेव्हां भिंतीला टेकून उभी असलेली शरयू त्याला दिसली होती–असें तीन चार वेळा झालें होते–बाजूच्या घराचें, नि आपलें वाकडें आहे, हें शरयूला ठाऊक असूनहि ऐन दुपारीं ती आखाड्या जवळ उभी रहातें–केव्हां केव्हां दुपारचीं भांडीं घासतां घासतां राखेचा हात तिचा तसाच थबकतो, आणि ती त्या घराकडे पहात रहाते–एकदां दिगंबरनें तिचा हात धरून विचारलें होतें–
'लग्नापूर्वी तुझें कोणाशीं प्रेमबिम होतें कां ?'

'नाहीं—'

'हें घर तुला आवडत नाहीं ?

'आवडतें—'

'मी नवरा तुला नको होतों ?

'तसें नाहीं—'

'मग तुला काय कमी आहे ? बापाकडे दोन वेळ जेवायला मिळतांना पुरें होतें–इथें पोटभर मिळतें ना ?'

'मिळतं !'

एवढं वदवून तो उद्योगाला लागला होता–लग्नापूर्वी ही शहरांत होती–लग्नापूर्वी कांहींतरी भानगड असावी, हाच तर्क त्यानें ठरवला–हें जेव्हां त्याच्या मनानें कायम केलें, तेव्हांपासून शरयूला माहेर वर्ज झालें–एवढं खायला प्यायला घालून ही भारल्यासारखी कां ? याचें उत्तर त्यानें एवढेंच शोधलें होतें. दिवसभर खावें, प्यावें–काम करावें–रात्रीं ये म्हणतांच यावें–खायला प्यायला घातल्यावर एवढा मोबदला हक्काचाच–दिगंबरची ही समजूत होती–शेवटी एखादं चौदावें रत्न त्याला दाखवावें लागणार होतें. तरी त्यानें लग्न झाल्यावर वर्तमानपत्रांचा, मासिकांचा संपर्क होऊं दिला नव्हता—शिक्षणाबद्दल तो बोलायचेंच झालें तर अवहेलनेनेंच बोलत होता—

—शरयू दिवसेंदिवस झुरत होती. सारें कसें मुकाट्यानें सहन करत होती. लग्न झाल्यावर पहिल्याच कांहीं दिवसांत या घराण्याची संस्कृती तिला कळून चुकली होती. अशा घरांत येईल दिवस तो घालवायचा या निग्रहानें ती वागत होती. कुठे कांहीं वाचीन म्हटलें नव्हतें. तोंडावाटे सूर काढूं दिला नव्हता. तिचें मावशीकडचें आयुष्य तर फार फार वेगळें गेलें होतें. घरांतलीं माणसें रसिक होतीं. सुसंस्कृत होती. आपला आवाज चांगला आहे, हें तिथेंच तिला कळलें होतें. ती इथें आली. या घराशीं समरस होण्याचा प्रयत्न केला. नवऱ्याबद्दल, सासूबद्दल धास्ती उराशी बाळगून येईल दिवस तो ती घालवूं लागली. पण केव्हां केव्हां तिचें मन तिच्या स्वाधीन रहात नसे. एका सरीनें लय घेतल्यासारखा पाऊस–काळ्या ढगावर किनार धरणारी सायंकाळ–दुपारी शेजार घरीं लागलेल्या रेडियोचे सूर–रात्रीचें जग भारावून टाकणारें पांढऱ्या रेशमासारखें चांदणें. जवळच्या घराच्या परसांतून येणारा जाईजुईच्या वास आणि हें वातावरण कंपित करणारा रेडियोचा आवाज. शरयू, शरयू उरत नसे. दिगंबरचें नातें–दुःख, संस्कृती, सासू–कशा म्हटलें कशाचें भान तिला रहात नसे–हें सारें दिगंबरला दाखवावें असें तिच्या मनाला शिवत नव्हतें असें नाहीं, पण साधें फुलझाडें लावायचें, त्यानें उडवून लावलें होतें. आपण होऊन एकशब्द तो कधी प्रेमळपणीं बोललाच नव्हता. त्याच्या डोळ्यांना, थिट्या बोटांना आणि ओरखड ओढावा, तशा आवाजाला ती थरकांप घ्यायला लागली होती. मुकाट्यानें ऐकत होती.

सासूनें मुसलमान पंचाक्षरी बोलावला. शरयूनें मग समजावून सांगितलें, मला कांहीं होत नाहीं. मी चांगली वागेन. पण सासूला तें पटत नव्हतें. दिगंबरनें फारसें लक्ष दिलें नव्हतें.

—पंचाक्षरी आला, त्यानें मांड भरला. लिंबू, उडीद, गुलाल–विचित्र विचित्र असें त्यानें मांडले. शरयूला त्यानें आंघोळ करवून पुढ्यांत बसवलें. त्या मांत्रिकाचा चेहराच उग्र होता. डोळे लाल होते. तो समोर उभा राहिला आणि उडीद मारूं लागला. शरयू मनांत हंसत होती. जरा वेळानें हा गप्पा बसेल असें तिला वाटत होतें. पण मग त्यानें वेताची छडी उचलली. डोळे लाल झाले. त्याची मुद्रा भयंकर दिसूं लागली. हा वेताच्या काठीचा वार जवळ येत होता. तेव्हां शरयू तोंडाला येईल तें बोलूं लागलीं. आजेसासू असल्याचें तिनें कबूल केलें. 'लग्न झाल्यावर वाटेंतच हिला धरलीस का' असें मांत्रिकानें विचारलें, आणि शरयूनें होय म्हटलें. हें सारें आटोपलें आणि शरयू निचेष्ट पडली.

× × ×

काळ दिवसाचे पंख फडफड करत होता. रात्र झाली होती. दिगंबर कुठून तरी बाहेरून आला होता. दोन घास खाऊन तो अंथरुणावर पडला. तिथेंच त्याला झोंप लागली होती. सध्या खताच्या मासळीचा त्याचा उद्योग चालला होता. घरांत मोजकें बोलत होता. शरयूचा कांहींही विचार न करतां हक्कानें तिला भोगत होता. लहर आली, कीं तिला बदवीत होता. तिला रडवलें, कीं त्याला आपल्या पेक्षां जास्त शिकलेल्या बायकोला आपण रडवतों याचें त्याला समाधान लाभत होतें.

पंचाक्षऱ्याच्या सामर्थ्याचा कांहीं उपयोग झालासा शरयूच्या सासूला वाटत नव्हतें. अजूनही शरयू केव्हां केव्हां भान नसल्या सारखी वागत होती. चांगली बदवून तिला सावध करावी लागत होती. आपली सासू अशा उपायांना दाद देणार नाहीं अशी तिला मनोमन खात्री होती. शेवट पर्यंत ती अशीच छळीत रहाणार होती.

–बाहेर पिठासारखें मऊ मऊ चांदणें पडलें होतें–आला वारा सुटला होता. संमिश्र गंधानें ओला झालेला–मालकंसचे सूर चांदण्यांत विरत होते–आणि झुरणी लागलेल्या शरयूचे पाय भान नसल्यासारखें दूर उघडायला सरकत होतें.

•••

अनुक्रमणिका






दीपावलीच्या सप्टेंबर ६३ अंकांत प्रसिद्ध झालेल्या आदिवासींच्या जीवनाचें वास्तव दर्शन घडविणाऱ्या लेखाचा हा वाचनीय पुढील भाग—

# मैकल पर्वतराजींतील

# मदिरावेडी 'बैगा'

—यशवंत शास्त्री



**बैगा** जमातीच्या साध्या आणि सरळ जीवनांत जर कोणती दुसरी गोष्ट थैमान घालीत असेल तर ती त्यांचा अंधविश्वास ही होय. ह्या अंधविश्वासामुळेंच भूत, पिशाच, चुडेलन (डाकिण) आणि राक्षस हे सर्व काल्पनिक सृष्टींतील घटक ह्या लोकांच्या मानगुटीवर बसले आहेत! गंमत अशी कीं, भूत –पिशाच्चाला ह्या बैगांच्या नित्याच्या जीवनांत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे आणि त्यांच्या निवारणार्थ या लोकांच्या जीवनांतील जवळजवळ निम्म्यापेक्षां अधिक काळ खर्ची पडत असतो. भूतपिशाच्चांचा नाश करण्यासाठीं मंत्रतंत्रासोबतच ह्या लोकांना आपल्या देवदेवतांनाहि दरेस द्यावें लागतें! ह्यामुळेंच जादु–टोण्याचे प्रकारहि येथें बळावलेले दिसतात.

एकादी रोगराई जर गांवांत आली, तर ती पिशाच्चाचीच करणी आहे, असेंच हे लोक समजतात. बहुतेक गांवी ह्यासाठीं एकादा तरी मांत्रिक असतोच. हे लोक, तसें पाहिलें तर, शाक्तपंथीय आहेत व अशा पंथियांत हें वारें बव्हंशी शिरलेलें असतें. वाघानें एकाद्याला ठार केलें, तरी वाघाच्या स्वरूपांत अमुक अमुक मेलेला मनुष्य आला होता आणि तो ठार झालेल्या माणसास घेऊन गेला, असें मांत्रिक सांगूं लागतो. ह्या मांत्रिकाला कित्येकदां भूत–पिशाच्चाचें झोपेंत 'दर्शन' घडत असतें. स्वप्नांत दिसणाऱ्या कांहीं प्रकारांची बाधा स्त्रियांना हटकून होते. 'मनी वसे ते स्वप्नी दिसे' अशांतलाच हा प्रकार असावा. अमुक मेलेल्या माणसानें आपल्याला स्वप्नांत अमुक अमुक सांगितलें म्हणून तमुक गोष्ट केलींच पाहिजे, अशा फिकिरींत हे लोक सदैव असतात. अंगांत पिशाच्चाचा संचार झालेले मांत्रिकहि तुम्हांला भरपूर प्रमाणांत आढळतील. चौरादादर हें अशा मांत्रिकांचें प्रमुख स्थान आहे. बैगांचीं भुतें आणि देवता यांचा इथें संघर्षात्मक संगम झाला आहे, असें म्हटल्यास हरकत होणार नाहीं.

चौरादादर हें अत्यंत उंचावरचें ठिकाण आहे. पण येथें जाऊनच भूतबाधा झालेल्या लोकांना आपली सुटका करून घ्यावी लागते. निरनिराळ्या मांत्रिकांनीं कित्येक जागीं पिशाच्चांना गाडून ठेवलेलें मी स्वतः चौरादादर येथें जाऊन पाहिलें आणि त्याच सोबत कित्येक देवतांच्याहि जागा निर्माण झालेल्या मला दिसल्या. वाटेल तेंव्हा वाटेल तिथें देवांची निर्मिती झाल्यामुळें व हवें तिथें पिशाच गाडलें गेल्यामुळें चौरादादरचें स्वरूप थडगी असलेल्या जागेसारखेंच झालें आहे. चौरादादर येथें इतकी मोठी पिशाच्चांची 'वस्ती' असूनहि माझ्या मुक्कामांत मला एकहि भूत दृष्टीस पडलें नाहीं! येथील एका मांत्रिकाला मी भूत दाखविण्याची विनंति केली व त्यानें ती कबूलहि केली परंतु त्यासाठीं मला पुढील अमावास्येपर्यंत थांबणें जरूर होतें. भुतासाठीं एवढा वेळ दवडणें मला शक्य नव्हतें आणि भूत दृष्टीस पडणार नाहीं याचीहि खात्री होतीच. भूत दाखविण्याचें अभिवचन मला ज्या मांत्रिकानें दिलें तो मांत्रिक वचन देतांना दारू पिऊन तर्र होता हेंहि मी ओळखूं शकलों. चुडेलन (डाकिण) कशी असते म्हणून मी त्याला विचारलें, तेव्हां त्यानें तिचें भयानक वर्णन केलें. समोरच्या झाडावर बसून मव्हाची दारू पीत असलेली चुडेलन आपल्याला कालच समोरच्या पिंपळाच्या झाडावर बसलेली दिसली आणि नंतर आपण आपल्या मंत्रसामर्थ्यानें तिला खाली बोलविलें होतें, असेंहि त्यानें सांगितलें. अर्थात दारूच्या नशेंत त्याला ती चुडेलन दिसली असावी आणि अद्यापहि त्याची दारू उतरली नसल्यामुळें तिची आठवण त्याच्या मनांत कायम असावी! कोणत्याहि बैग्याला विचारा–तो आपण भूत किंवा चुडेलन पाहिली आहे असेंच सांगेल. बैग्यांची ही भीति म्हणजे एक मानसिक विकृतीच आहे आणि ह्या विकृतीनें त्यांचें जीवन खूपच पछाडलें गेलें आहे. ह्या भीतीमुळेंच जंगलांतील वाघाला न डरणारा हा बैगा आज कांहींसा कमकुवतहि झाला आहे.

वाघाची 'दाढ बांधणा' ऱ्या मांत्रिकाचाहि एक वर्ग दृष्टीस पडतो. वाघानें एखाद्या माणसाला नेलें कीं, हा बैगा मांत्रिक त्या जागीं जातो. जमिनीवर जेथें रक्ताचे डाग पडले असतील, तेथें तो एक वर्तुळ तयार करतो. नंतर स्वतःचे गुडघे व दोनहि हात जमिनीवर टेकून हा मांत्रिक त्या वर्तुळाभोंवतीं मंत्र म्हणत रिंगण घालतो व तो प्रकार आजोपतांच रक्त सांडलेली मूठभर








माती घेऊन स्वतःच्या तोंडांत कोंबतो. हा प्रकार चालू असतांना मांत्रिका सोबतचे कांहीं लोक लांब उभे असलेले एक–दोन लोक पुढें येतात व हातांतील काठीनें त्या मांत्रिकाच्या पाठीवर वार करतात. ह्याचा अर्थ असा कीं, माणसाला गिळकृत करणारा वाघ ठार झाला आहे! कांहीं ठिकाणीं अशा प्रसगीं डुकराचा बळी दिला जातो किंवा रक्ताची माती मुंग्यांच्या वारुळांत टाकण्यांत येते.

विशिष्ट मंत्र म्हणून व झाडाच्या बुंध्यांत लोखंडी खिळा ठोकून वाघाची 'दाढ बांधणा'रे मांत्रिकहि आहेत. पूर्वी मंडला जिल्ह्यांत व विशेषतः कान्हा–केसलीच्या घनदाट अरण्यांत नरभक्षक व्याघ्रांचा प्रचंड सुळसुळाट होता. कान्हा–केसलीचा सध्याचा रस्ता बांधला जात असतांना कित्येक लोक ह्या वाघाची शिकार झाले होते. ह्या ठिकाणीं एका बैगा मांत्रिकानें एका अवघड ठिकाणच्या वृक्षाला खिळा ठोकून त्या नरभक्षक व्याघ्राची दाढ बांधली होती. तो मांत्रिक मी पाहिला नाहीं. पण कान्हा येथील तें झाड मात्र मी पाहून आलों. झाडाच्या बुंध्यांत एक खिळा ठोकलेला असून त्याखालीं वाघानें खरचटून टाकलेला बुंध्याचा कांहीं भाग व त्यावर उमटलेलीं व्याघ्र नखें आजहि दृष्टीस पडतात. हा खिळा जर काढून टाकला तर, वाघाची दाढ सुटते व तो पुन्हां माणसें खाऊं लागतो, असें म्हणतात. खिळा ठोकल्या-नंतर दांतखिळी बसलेल्या वाघाचें काय होत असेल, एवढीच कल्पना आपण केलेली बरी!—ह्या दाढ बांधण्यावर ह्या जंगली लोकांचा कमालीचा विश्वास आहे. आणि ह्या अंधविश्वासामुळेंच कित्येकदां हे लोक वाघाची शिकार होतात. वाघाची दाढ मांत्रिकानें बांधली आहे अशा विश्वासानें माणूस वावरूं लागला कीं, वाघाचें मात्र आपोआपच फावतें!



करमा–नृत्यांत रंगून गेलेल्या बैगा ललना.

दारूला बैगाच्या नित्याच्या जीवनांत कमालीचें महत्त्व आहे. अन्नाइतकीच बैग्याला दारूची आवश्यकता असतें–नव्हे, अन्नापेक्षांहि अधिक! धार्मिक कार्यांतहि दारूशिवाय भागत नाहीं. गांवांतील पंचायतीनें जर एकाद्या बैग्याला दंड केला तर त्यांची फेड त्याला सर्वांना दारू पाजूनच करावी लागते. लग्नसमारंभ किंवा वाङ्निश्चय अथवा नृत्य प्रसंग दारूशिवाय होऊंच शक्य नाहींत. बहुतेक घरांतून हे लोक आपली दारू तयार करीत असल्याचेंहि ऐकिवांत आहे. दारूचे दुष्परिणाम त्यांच्या जीवनावर झालेलेहि स्पष्ट दिसतात. बेकायदा दारू गाळण्याला सुमारच नाहीं. सरकारी कर्मचारी त्याला आळा घालण्यास असमर्थ ठरले आहेत. मी डिंडोरी तहसिलींत दौऱ्यावर असतांना आठ दिवसांपूर्वींच एका पोलीस इन्स्पेक्टरला ह्या बैग्यांनीं ठार केल्याचें समजलें. बेकायदा दारू गाळण्याचा गुन्हा पकडण्यासाठीं हा इन्स्पेक्टर एका गांवी गेला होता व तो आल्याचें समजतांच गांवकऱ्यांनीं दारूच्या धुंदींत त्याचा कुऱ्हाडीनें खातमा करून टाकला होता. कांहीं लोकांची धरपकडहि झाली परंतु दारू उतरल्यानंतर प्रत्येकानें आपला गुन्हा कबूल केला असें म्हणतात. कृत्य कोणतेंहि असो, तें खोटें बोलून लपविण्याचा प्रयत्न बैगा इसम कदापि करणार नाहीं. त्याची सत्यनिष्ठा अलौकिकच आहे. दारूच्या नशेंत एकादा गुन्हा केला कीं, दारू उतरल्यानंतर हंसत हंसत सर्व कांहीं खरें खरें सांगून टाकण्यास बैगा मागेपुढें पहात नाहीं. बैगा इसम कधींहि भीक मागणार नाहीं. तो उपाशी मरेल; पण भीक मागणार नाहीं. चोरी करणें त्याला ठाऊक नसते. त्याच्या हातून गुन्हा झालाच, तर तो बाईपाई किंवा दारूपाईच होतो!

हे लोक अत्यंत आदरातिथ्यशील आहेत हें पूर्वीं सांगितलेंच. बालाघाट जिल्ह्यांतील बैगा–गोंड जमातीसंबंधीं लिहितांना, ह्या जमातींतील लोक चालीरीतीबाबत अगदीं इंग्रज लोकांसारखे आहेत, असें मी म्हटलें होतें. एक गोष्ट आज पुन्हा सांगाविशी वाटते. दोघा मित्रांची जर अचानक जंगलांत गांठ पडली, तर ते दोघे प्रथम हस्तांदोलन करून नंतर एकमेकाला आलिंगन देतील. हें आलिंगन देतांना हातांनीं ते परस्परांचे बाहू धरून ठेवतात. बाप मुलाला भेटला कीं, तो प्रथम मुलाच्या हनुवटीला आपल्या उजव्या हातानें स्पर्श करील. नंतर मुलगा ओणवा होऊन दोनहि हातांनीं बापाचे पाय धरील. बैगा मुलगा वयांत आला कीं, त्याच्यावर आई–बापाची सक्ति चालत नाहीं. बाहेरच्या जगांत कांहींहि करण्यास तो मोकळा असतो. बैगा मुलें व मुलीं यांच्यांत वाजवीपेक्षां लवकरच लैंगिक भावनांचें सृजन होतें. बस्तरप्रमाणें येथें 'गोतुल' नाहींत. इंग्रजांत 'डॉर्मेटरी'ची जी प्रथा आहे तीच प्रथा 'गोतुल' मध्यें अंगिकारली जाते. हें 'गोतुल' येथें नसलें, तरी रानांवनांत मुलें व मुलीं स्वेच्छेनें व स्वैरतेनें एकमेकांजवळ येतात. लहान मुलें वयांत येऊं लागलीं कीं, त्यांचे कांहीं विशिष्ट प्रकारचे खेळ असतात, आणि हे खेळ खेळतांनाच मुलें व मुली यांना शारीरिक स्वरूपाचा पहिला लौकिक अनुभव येऊन गेलेला असतो. स्त्री–पुरुषांतील चुंबनाची मात्र ह्या लोकांत प्रथा नाहीं. स्त्रियांच्या उरोजावरूनच लैंगिक आकर्षणाचें मोजमाप होत असतें. उरोजासोबतच स्त्रियांच्या केशरचनेनें पुरुष अधिक आकर्षित होत असतो. निरनिराळ्या प्रकारची केशरचना ह्या स्त्रिया करतात.

बैगा पुरुष व स्त्रिया उत्तम कविता करतात व त्या बव्हंशी लैंगिक प्रेमावरच आधारलेल्या असतात. त्यांना लिहिता–वाचतां येत







नसलें तरी अशा मुखोद्गत कविता तुम्हांला भरपूर ऐकावयास मिळतील. ' ददरिया ' नामक प्रेमगीतें अशाच प्रकारचीं आहेत. हीं प्रेमगीतें मोठ्या आवडीनें आणि एकमेकांना खुणावून तरुण स्त्री-पुरुष गातात. 'चोले में हरदी लगादे-एहे हाय' हें 'ददरिया-गरमें' प्रकारचें गीत बैगा लोकांत विशेष प्रचलित आहे. तशीच दुसरी बैगा ' ददरिया ' मला ऐकावयास मिळाली—

" घडी बल वात बतायदे वहिनी
भाजीमें खाय हे भात-घडी बल बात...
मीन वन तेंदू-मान वन चार......"

हीं गाणीं कित्येकदां नृत्यप्रसंगीहि वापरलीं जातात. ' ददरिया'चा आणखी एक प्रकार आहे. गांवानजीकच्या दोन टेकड्यांवर दोन गट जाऊन बसतात. कित्येकदां एका गटांत फक्त स्त्रिया व दुसऱ्या गटांत फक्त पुरुष असतात. नंतर एक गट दुसऱ्या गटाला स्वकृत ' ददरिया ' काव्यांत प्रश्न विचारतो व त्याचें त्याच स्वरूपांत काव्यांतच दुसरीकडून उत्तर दिलें जातें. होळीच्या दिवसांत ' ददरिया 'ची रंगत कांहीं और असते. ह्या काव्यांतून नंतर एका स्त्रीचें दुसऱ्या पुरुषावर प्रेम जडल्याचें दिसून येतें. कित्येकदां मात्र ह्या प्रकाराला भलतेंच स्वरूप येतें. म्हटल्या जाणाऱ्या काव्यांतून शिवीगाळ होऊन दोन गटांत मारामारी होण्याचीहि पाळी येतें. म्हटलें तर ठीक नाहीं तर सारेंच बिकट !

नृत्य प्रसंगांत, सर्व आदिवासी जमातीपेक्षां, बैगा आदिवासी हा अधिक वाकबगार असतो. आदिवासी नृत्यांत बैगा स्त्रीची बरोबरी कोणीहि करूं शकणार नाहीं. ह्या नृत्य-गायनांच्या पडसादांनीं कजरीबन आजहि बहरून गेलें आहे. प्रीतीचा उदय हृदयांत झाला कीं, तोंच नृत्याचा मोसम होतो ! अशावेळीं ' मांदर'च्या (जंगली पखवाज) आवाजानें सारें रान दुमदुमून जाईल, सर्वजण चंद्राच्या प्रकाशांत गोळा होतील. नृत्याच्या तयारीनेंच ते आलेले असतात. स्त्रियांनीं आभूषणें घातलेलीं, पुरुषांनीं पागोट्यावर मोरपंखाची कलगी लावलेली. आकाशांत चंद्र असतोच ! पोटांत थोडीशी दारू गेली कीं, ' मांदर '-मधून निघणारे ' बोल ' अधिक मादक वाटूं लागतात आणि त्या ' बोला ' मागून कजलीबनांतील प्रियंवदांच्या गळ्यांतूनच निघणारे ' ला-रे-ला'चे बोल घुमूं लागतात. एकदां पुरुष व नंतर स्त्रिया यांचें लयबद्ध गायन व सोबतच नृत्य चालूं होतें. सारें रान त्या प्रवाहांत डुंबून जातें. रात्र-रात्रभर हीं नृत्यें चालूं असतात. ' मांदर ' व ' टिमकी ' ह्या वाद्यांना नृत्य प्रकारांत प्राधान्य असतें.

' करमा ' हा बैगांचा प्रमुख नृत्य प्रकार आहे. हें एक संघ-नृत्य असतें. स्त्री-पुरुषांचे दोन गट मैदानांत उभे राहतात. मध्यांत 'मांदर' घेतलेला पुरुषांचा गट असतो. प्रथम पुरुष गाण्याची सुरवात करतात व स्त्रिया त्याला लय देतात. कित्येकदां दोन गट एकमेकांपुढें येऊन परत मागे जातात आणि कित्येकदां ' मांदर ' घेतलेले पुरुष स्त्रियांच्या समोर नाचत व उड्या मारीत जातात. ह्या नृत्यांत स्त्रियांचा गट पुरुषांभोंवती सारखा रिंगण घालीत गात असतो. ह्याच करमा नृत्यांत ' झूमर करमा ', ' लाखी करमा ', ' खाला करमा ' असेंहि इतर प्रकार आहेत.

' तापाडी नृत्य ', ' झारपट नृत्य ' व ' बिलमा नृत्य ' हे नृत्यप्रकार ' करमा'च्या खालोखाल या लोकांना प्रिय आहेत. प्रत्येक नृत्यप्रकाराचीं गाणीं निरनिराळ्या प्रकारचीं व 'मांदर' किंवा 'टिमकी'च्या निरनिराळ्या तालावर गाईलीं जातात व निरनिराळ्या ठेक्यांवर नृत्य चालूं असतें.

मंडल्यांतील कजरीबन ह्या नृत्य प्रकारांनीं समृद्ध आहे. 'करमा'-नृत्याला बैगा संस्कृतींत फार महत्वाचें स्थान आहे. हें नृत्य करीत असतांना लोक आपलें सुख-दुःख पार विसरून गेलेलें असतात. निसर्ग, नृत्य आणि गायन या तिहींचा असा विलोभनीय संगम केवळ कजरीबनांतच झालेला दृष्टीस पडेल !

क्रमशः ●●●








एक धुंद स्पर्श झाला. डोळ्याची पापणी थुई थुई नाचूं लागली आणि......

—वामन प्रभु

# लो|ह ला|ग|ता प|रि|सा|शीं

त्या दोघीं मला नेहमीं बरोबरीनेंच भेटत. आम्ही एकमेकांशीं कधींच बोललों नाहीं. ओळखीचें स्मितहि कधीं कुणीं ओठांवर रुळविलें नाहीं. तरीहि आम्ही एकमेकांना सवईनें ओळखूं लागलों होतों.

साधारण तीन वाजताच्या सुमाराला मी बहुधा ऑफिस शेजारच्या कॅफेंत पुरेशा कॉफीचा कोटा भरून घेण्यासाठीं जात असे त्यावेळीं आजुबाजूच्या ऑफिसांचे लंच अवर्स संपलेले असल्यानें माझ्या आवडीची कोपऱ्यांतली खिडकी जवळची जागा रिकामीच सांपडे. मग हलके हलके सिगारेटचे कश रक्तापर्यंत पाझरवीत मी बाहेरचें नेहमीचें दृश्य नजरेनें बांधून घेत कॉफीचे घोटं घेऊं लागत असे.

बहुधा त्या यायच्या तेव्हां, मी पहिली कॉफी संपवून दुसरीची वाट बघत असे. तर कधीं पहिल्याच कॉफीच्या अधेमधें घुटमळत असे.

हॉटेलचे दोन हॉल होते. समोरच्या विस्तृत हॉलमध्यें नेहमींच गर्दी असायची. ऑफिसेसचे लंच अवर्स आणि बाजूच्या थिएटरांतील चित्रपटाच्या वेळां वगळल्या तर हा बाजूचा छोटा हॉल नेहमीं शांत असे.

त्यांची चाहूल मला खिडकींतूनच लागायची. हॉटेल ज्या इमारतींत होतं तिच्या दूरच्या शेवटल्या कोपऱ्यांतल्या दुकानांत त्या काम करीत. तिथून हॉटेलच्या प्रवेशदाराशीं येईपर्यंत त्या नुसत्या किलबिलत असत. त्या किलबिलत असत म्हटलें, तें जरा चुकलेंच. कारण त्या दोघींतील एकच तेवढी बोलत असे. बोलत असे नि बोलतां बोलतांच हंसूं लागे. त्या बोलण्यांत नि हंसण्यांत जगाविषयीच्या बेफिकिरीची एक ग्रर्द छटा नेहमीच झळझळायची.

ही हंसणारी मुलगी नेहमीच त्या दोघींत उठून दिसायची. तिचं सारं कांहीं कसं वेगळं होतं. एकतर कुठल्याहि सर्वसाधारण माणसाहून तिची उंची जास्त होती. पण त्याच-प्रमाणांत शरीराची सुसंबद्ध घडण असल्यानं तिचा बांधेसुदपणा प्रथमदर्शनींच नजरेंत भरायचा. उंच टांचांच्या चपलांमुळं तिचे भरदार नितंब जरासें उंचावून मागे झुकलेले असायचे. कपड्यांची निवडहि ती आपल्या तांबुस गोऱ्या कातडीला शोभेशीच करायची. तिच्या स्कर्टच्या कमरेच्या वरचा भाग बहुधा पिवळ्या जर्द कापडाचा असायचा आणि उरलेल्या घेरावर मोठाल्या टिपक्यांचं कुठलं तरी लेटेस्ट डिझाईन. ती हंसूं लागली म्हणजे तिच्या लिपस्टिकचा हलकासा स्पर्श झालेल्या ओठांची नि तिच्या बुटक्या नाकाची मोठी गमतीदार हालचाल व्हायची.

माझा ह्या साऱ्यांशीं कितीतरी दिवसां[illegible] परिचय होता. त्यांचे ओळखीचें हंसणें ऐकूं आलें म्हणजे इमारतीच्या व्हरांड्यातून उत्तरेकडच्या त्या दुकानांतून त्या निघाल्या[illegible] मी ताडायचा. नंतर मनानंच त्याच्या आसपास रेंगाळत रहायचा.

हॉटेलांत त्या शिरूं लागल्या, कीं काऊंटर-वरचा मालकाचा तरुण मुलगा त्यांची आस्थेनें

विचारपूस करायचा. तीहि मग तोंडभर हंसून त्याचं समाधान करायची. तिची प्रत्येक हालचाल नेहमीच लयबद्ध आणि तरीहि जाणीवपूर्वक व्हायची. आपण सुंदर आहोंत, हें तिला पूर्णपणें ठाऊक होतं. आणि ही जमेकडची बाजू ध्यानांत घेऊनच तिचं वागणं असायचं.

एखादेवेळीं जोशी माझ्याबरोबर कॉफी ध्यायला आला असला तर तो ह्या जोडीविषयीं बोलतांना कमालच करायचा. ही ॲंग्लो इंडियन रक्ताची पोरगी आपलं सौंदर्य अधिक उजळून नि उठून दिसावं म्हणून मुद्दाम त्या नेटिव्ह, काळ्यासावळ्या पोरीबरोबर भटकत असते, असं तो ठामपणें सांगायचा. त्यानं तर एकीला गुलाबाचें फूल आणि दुसरीला गुलाबाचा कांटा अशीं नांवंहि बहाल करून टाकली होती.

ही त्या गुलाबी पोरीबरोबर नेहमी काट्यासारखी राहणारी पोरगी मलाहि नेहमीच सलत असे. ती कधीं फारशी बोलत नसे नि हंसतांना तर तिला मी कधीं बघितलसं आठवतच नाहीं तिचं नाक अगदीं सरळ आणि बरंच लांब होतें. चेहराहि लंबोळका होता. तिचे केस मात्र बरेच लांब होते. पण त्यांच्याकडे तिचं दुर्लक्ष असल्यानं कुठल्याहि तरूण मुलीच्या केसांना सामान्यतः आढळणारी विशिष्ट तकाकी तिच्या केसांत दुर्मिळ होती. तेहि तिच्या सांवळ्या चेहऱ्यासारखेंच नेहमीच भावशून्य वाटायचें. गुलाबी रंगाच्या, आंग्ल रक्ताच्या त्या बांधेसूद उंच पोरीच्या वागण्यांतील आत्मविश्वासाचा हिच्यांत अजिबात अभाव होता. त्या बहुधा नेहमी चहा ध्यायच्या आणि चहाचा प्रत्येक घोट गिळतांना ही बिचकल्यागत रेंगाळांयची. खुर्चीत बसण्यापासून तो बाहेर जाईपर्यंत तिच्या साऱ्या हालचालींत असाच कंटाळा आणणारा भाव असायचा. ती आजूबाजूच्या माणसांच्या अस्तित्वानं विचलीत असायची. स्वतःच्या हालचाली अव्यवस्थित तर नाहींत ना ह्या शंकेनं गोंधळलेली असायची. किंवा कधीं कधीं आपल्या मैत्रिणीच्या सौंदर्याभोंवतीं भिरभिरणाऱ्या नजरांच्या फुलपांखरांनीं तिच्या वागण्यांत असंबद्धता निर्माण केलेली असायची.

मला तर ह्या सावळ्या पोरीचा रागच यायचा. एक तर तिच्या चेहऱ्याच्या एकंदर जडण–घडणीच्या ढंगावरून; विशेषतः तिच्या डोळ्यांवरून ती बंगाली असल्याचं मी कधींचंच मनाशीं निश्चित केलेलं होतं. बंगाली स्त्रियांच्या सौंदर्याविषयीं माझ्या मनांत फार मोठं आदराचं स्थान होतं आणि त्या कल्पनेला आपल्या डोळ्यांतील भावशून्यतेनं, वागण्यांतील विचलीतपणानं नि आपल्या कोऱ्या–सांवळ्या चेहऱ्यानं ती नेहमीच धक्के देत होती. शिवाय त्या गुलाबी पोरीबरोबर तिला बघितलं म्हणजे अर्धा उत्साह नेस्तनाबुद होत असल्याचं जोशीचं म्हणणंहि नेहमी नेहमी आठवत असायचंच.

पुढें पुढें मात्र मला ह्या कांट्यांच्या गुच्छाला सहन करून घेण्याची सवय झाली. माझ्या कॉफी पिण्याच्या वेळांत त्या आल्या म्हणजे मी सवईनं तिचं अस्तित्व विसरून त्या गुलाबी कातडीच्या, किंचित् अपरं नाक असणाऱ्या, पाणीदार डोळ्यांच्या, ख्रिश्चन पोरीच्या हालचालींतील लय बसल्या जागून टिपून घेऊं लागलों. तिच्याशीं विशेष नम्रतेनें वेटर बोलूं लागला किंवा तिच्याच ऑफिसांतल्या कुणी त्या दोघींना मसालादोसा अथवा बिस्किटें ह्यांची ऑफर दिली म्हणजे आपल्या सौंदर्याच्या विजयाचा एक सुक्ष्म आनंद तिच्या चेहऱ्यावर तरळून जाई. त्याच्या रेषान् रेषा मी बरोबर उलगडून काढूं लागलों. स्वतःच्या विनोदावर स्वतःच हंसताना तिच्या गालावर उमटणाऱ्या नाजुक खळग्यांशीं आपली नजर घुटमळूं देतांना, नाहीं म्हणायला त्या काळ्यासावळ्या संथ पोरीच्या व्यक्तित्वाची उपस्थिती, अधुनमधून आपली काटेरी झालर मनाला बोचवी एवढेंच! क्वचित् प्रसंगीं तर तिच्या भर तारुण्यांतल्या ह्या संथपणाचा मला तिटकाराहि येई. पण मी तिचेवर कधींच रागावलों नाहीं; त्यांचेशीं प्रत्यक्ष बोलणें नसल्यानें तें शक्यहि नव्हतें म्हणा!

मध्यंतरी असेंच कांहीं दिवस निघून गेले. ऑफिसांतल्या वाढत्या धांवपळीनें माझी कॅफेंत जाण्याची निश्चित अशी वेळ उरलीच नाहीं. आणि त्यामुळें त्या दोघीहि मला कितीतरी दिवसांत दिसल्या नाहींत.

माझ्या कॉफी पिण्यावर, अथवा कॉफीच्या चवीवर त्यामुळें अजिबात परिणाम झाला नाहीं. मी नेहमीच्याच जागेवर बसून बाहेरचें चर्च, त्या समोरचा रस्ता, रस्त्याच्या कडेच्या केळी नि भेळ ह्यांच्या दुकानाभवतींची विद्यार्थ्यांची वर्दळ, त्या पलिकडली लाल रंगाची शाळेची इमारत, ह्या साऱ्यांत गुरफटलेलीं हिरवीगार झाडें नि ह्या सर्वांच्या पाठीशीं उभें असलेलें आभाळ ह्यापैकीं कुठें तरी नजर बांधून टाकून नेहमीप्रमाणें मनांतल्या कच्च्या विचारांना अधिकाधिक स्वच्छ नि टोंकदार करीत बसला राही. हॉटेलांत पुष्कळदां तऱ्हेतऱ्हेचीं माणसं येत. कुणीं राजकारणावर तर कुणी इंग्लंडमधील क्रिकेटची सद्यः स्थिती ह्या त्याहूनहि जिव्हाळ्याच्या विषयावर चर्चा करीत. मी आपल्या सवईनें मग त्यांचें संभाषण कान देऊन ऐकूं लागे.

नाहीं म्हणायला एकदां बरेंच दिवसानंतर माझेबरोबर कॉफी ध्यायला आला असतांना जोशीनं त्या मुलींची आठवण काढली होती. त्यानं पुन्हा एकदां गुलाब आणि काटे ह्यांची त्यांना उपमा दिली. नि मग आम्ही त्या विनोदावर सवईनें हंसलों होतों.

आणि नंतर अवचित् एका शनिवारी आमची भेट झाली. अर्थात आमची पूर्वी कधींच प्रत्यक्ष ओळख झालेली नसल्यानें बोलण्याचा अगर ओळखीचें स्मित करण्याचा प्रश्नच नव्हता. आणि ही कांटेरी कंटाळवाणी मुलगी स्मित करूं शकते हें प्रत्यक्ष आइन्स्टिननें आपल्या सापेक्षतावादाच्या सिद्धांतानें सिद्ध करून दाखवलें असतें तरी मला पटलें नसतें.

आज बरेंच दिवसानंतर माझी आवडती जागा रिकामी मिळाल्यानं सुरुवातीलाच मी एका सुक्ष्म आनंदाच्या लहरींत होतों. त्या झोकांतच सिगारेट शिलगवून मी नेहमींप्रमाणें साऱ्या हॉटेलांतून नजर भटकविली. एका अगदीं कोपऱ्यांतल्या टेबलाशीं ती पाठमोरी बसली होती. अनेकदां पाहिलें असल्यानें आणि तेहि त्या सुंदर मुलीच्या पार्श्वभूमीवर हिचें सामान्यपण मनावर ठसलें असल्यानें मी तिला पाठमोरीहि ओळखूं शकलों. तिच्या बरोबर तिची नेहमीची मैत्रीण नसल्यानें थोडेसें चुकल्यासारखेंहि वाटलें. पण आपल्याला काय

**महत्वाची सूचना–**

**ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.**

**—व्यवस्थापक**

त्याचें म्हणून मी समोरच्या कॉफीचा एक एक घोट घेत कुठली तरी योजना मनाशीं रेखाटूं लागलों.

पण आपलें डोक्यांतल्या विचारांत नि आराखड्यांत लक्ष लागत नसल्याचें माझ्या लवकरच ध्यानांत आलें. निश्चितपणें त्या कोपऱ्यांतल्या टेबलाकडे माझें मन ओढावूं लागलें होतें. मग मी विचार करणें सोडून देऊन बाहेर बघूं लागलों. त्यांत मन रमेना म्हणून आजुबाजूला चालणारीं संभाषणें चोरून ऐकूं लागलों.

' देखोना कैसा कब्बुतरोंका जोडा बैठा है कोने में. ' माझा शेजारी अर्थपूर्ण हंसत त्याच्या सोबत्याला त्या बंगाली पोरीविषयीं सांगत होता.

' हूँ ! अरे बाबा जवानी म्हणतात ह्याला... आपल्याला काय...'

' लेकिन; हो तेंहि बरोबर म्हणा...करा लेको प्रेम...चालुं द्या गुटरुँ गूँ ऽऽ ' खबुत-राच्या आवाजाची त्यानं नक्कल केली आणि दोघंहि हंसले.

मला आधीं खूपच आश्चर्य वाटलं. त्या सर्वसामान्य पोरीला प्रियकर मिळावा. त्याचे-बरोबर तिनं कॅफेंत येऊन कॉफीचे घोट घेत एका कोपऱ्यांतल्या टेबलाशीं बसावें आणि आतां ह्या बाजूच्या माणसानें काढलेला खबुतरांच्या प्रेमालापाचा आवाज! माझ्या मनांतल्या त्या सावळ्या, कोऱ्या चेहऱ्याच्या, भावशून्य डोळ्याच्या, लांबट नाकाच्या नि लांबोळक्या चेहऱ्याच्या मुलीविषयीं असलेल्या चित्रांत हे रंग कुठेंच शोभत नव्हते—नव्हें, त्यांना स्थानच नव्हतें. उदास रंगाच्या साड्या नेसणाऱ्या ह्या मुलीनें संन्यास घेतल्याचें कळलें असतें तर मला मुळींच आश्चर्य वाटलें नसतें. पण हे असें म्हणजे...

मी मग त्या कोपऱ्यांतील टेबलाकडे काळजी-पूर्वक बघूं लागलों. माझा सुरुवातीला स्वतःवर विश्वास बसेना, तिचा साराच नूर पालटला होता. एकतर तिचें ते लांबसडक काळेभोर केस तिनें आज अतिशय काळजीपूर्वक गुंफले होते. जणूं बोटांना मलई लावून मग कुणींतरी त्या नरम–नाजुक बोटांनीं केसांना प्रत्येक पीळ हलके हलके गुंफला होता. इतका डौल नि इतकी मुलायम रेखिवता प्रत्येक पिळांत भरली होती. पांढरी शुभ्र साडी नि त्यावर फिकट रंगाचा ब्लाऊज ह्यामुळं ती एकदमच नजरेंत भरत होती. मुख्य म्हणजे आज तिचें कशाकडेंच लक्ष नव्हतें. पूर्वींसारखी ती कुणालाच बिचकत नव्हती. कुणाच्याहि अस्तित्वानें ती विचलीत होत नव्हती. एवढेंच नव्हे तर तिच्या प्रत्येक हालचालींत स्वतःविषयींचा दृढ विश्वास सामावलेला होता.

जाणारे–येणारे लोक त्यांच्या त्या एक-मेकांत हरवून गप्पा मारीत बसण्याकडे बघून अर्थपूर्ण हंसत होते. पण त्याचेंहि तिला भानच नव्हतें.

कुठल्यातरी कारणानें तिनें आपली खुर्ची जराशीं वळविली आणि क्षणभर तिची नि माझी नजरानजर झाली. तिच्या डोळ्यांना भावशून्य ठरविण्यांत आपण फार मोठी चुक केली असल्याचं माझ्या त्याच क्षणीं ध्यानांत आलं. एक खूपच सुखद अशी तेजपूर्ण लकाकी तिच्या डोळ्यांतून चमकत होती. जणूं जगातील








प्रत्येक असुंदर वा सामान्य गोष्टीला सुंदर करून टाकण्याचं सामर्थ्य त्या डोळ्यांत होतं आणि ती मधेंच हंसली. तेव्हां तर एवढ्या दूर अंतरावर असूनहि माझ्या अंगावर फुलें सांडल्याचा मला भास झाला.

आज तिची प्रत्येक हालचाल लयबद्ध होती. मी मनाशीं त्या उंच बांध्याच्या गुलाबी मुलीशीं हिची नव्यानं तुलना करून पाहिली आणि त्यांत कांहींच हंशील नसल्याचं माझ्या चटकन् ध्यानांत आलं.

हें सारं कांहीं निराळंच होतं. कोकिळेच्या गाण्यासारखं–मोराच्या नाचण्यासारखं उत्स्फूर्त असं. प्रीतीच्या पहिल्या स्पर्शानं तिचं सारं व्यक्तित्वच पालटून टाकलं होतं. पूर्वी नसलेली ती तरुण चमक तिच्या केसांवर रुळूं लागली होती. तिच्या डोळ्यांच्या बाहुल्या थुई थुई नाचूं लागल्या होत्या आणि एक विलक्षण आल्हादकारक तेज तिच्या चेहऱ्यावरून ओघळत होतं.

तिच्या समोर टेबलाच्या दुसऱ्या बाजूनें बसलेला तिचा प्रियकर तिला साजेसाच होता. इतरवेळीं कदाचित् तोहि एक सर्वसामान्य माणूस ठरला असता. इथें ह्या हॉटेलांतल्या कोपऱ्यांतील टेबलाशीं मात्र त्याच्या प्रत्येक हालचालींत मजनूचें सौष्ठव होतें. त्याच्या बोलण्याला फर्यादच्या प्रीतीच्या गंध होता. जगांतल्या कुठल्याहि प्रेमिकाहून तो तसूभरहि कमी नव्हता. त्याच्या पुढ्यांतल्या त्याच्या प्रेयसीनें म्हटलें असतें तर प्राणांची बाजी लावून, सातासमुद्रापलिकडून, राक्षसांच्या अज्ञात मायानगरींतून, त्यानें गुलबकावलीचें फूल आणून आपल्या प्रेयसीच्या रेशमी केसांत ऐटीनें खोवलें असतें. ह्याविषयीं कांहीं क्षणांतच माझी खात्री पटली.

आणि तिच्याविषयीं तर कांहीं सांगायला नकोच. ती बोलत नव्हतीच. कारण मला आणि तिच्या प्रियकराला दोघांनाहि तिचा प्रत्येक शब्द जगांतील सर्वोत्कृष्ट संगीतानें भारलेला असल्याचें जाणवत होतें. आपल्या प्रासादांत बसून ऐटीनें साऱ्या मालकीच्या वस्तूकडे बघावें तशा झोकानें ती साऱ्यांकडे बघत होती. जणूं साऱ्या जगाच्या साम्राज्ञीचें पद तिला मिळालें होतें.

खाणेंपिणें संपले ह्याचें दोघांनाहि भान नव्हतें. कितीतरी वेळ तीं दोघें एकमेकाकडे नुसतीच बघत बसून होती. अधुनमधून हंसणें वा एखाद–दुसऱ्या शब्दाचीं देवाणघेवाण सुरूं होती. पण शब्दाना अर्थ असण्याची आतां आवश्यकताच नव्हती.

तिच्या त्या प्रीतीच्या पहिल्या स्पर्शानें उजळून निघालेल्या सौंदर्याच्या गोड–सुखद-शात लाटा मी अजूनहि आपल्या हृदयात जपून ठेवल्या आहेत.

त्यानंतर त्या दोघीपैकीं कुणींच पुन्हा भेटलीं नाहीं. एखादवेळीं जोशी बरोबर असला म्हणजे त्यांची आठवण निघतेही. पण त्यानें पुन्हा तो गुलाबाचें फूल आणि कांटे ह्याचा विनोद केला, म्हणजे मी गंभीर होतो. आणि त्या दुपारी आपल्या प्रियकराच्या सहवासांत नव्यानें घडविली गेलेली तिची मूर्ती माझ्यासमोर उभी राहते. तिचे गाणारे शब्द, तिच्या लयबद्ध हालचालींतला आत्मविश्वास, तिच्या डोळ्यातील चपल लकाकी आणि तिच्या चेहऱ्यावर रुळणारा प्रीतीचा मंद प्रकाश-एखाद्या सुंदर भावपूर्ण कवितेसारखें ह्या साऱ्यांचे तरंग मग माझ्या अंतरांत कितीतरी काळ भरून राहतात.

●●●











*बर्फमय प्रदेशांतून बर्फाला छेदून जाणाऱ्या ' स्केट 'च्या धाडसी व चित्तथरारक सत्यकथेचा हा सप्टेंबर ६३ च्या अंकानंतरचा पुढील भाग--*

—जेम्स कल्व्हर्ट

पण आमच्या स्केटमधून आम्ही समुद्राच्या पृष्ठभागाखालून तीनशें फुटावरून कित्येक दिवस अखंड प्रवास करूं शकतों. गतीची जाणीव आम्हांला फारशी नसते. अणुभट्टीसाठीं बऱ्याच मोठ्या घेराची जागा लागते; त्यामुळें साध्या पाणबुडीपेक्षां अणुचलित पाणबुडीमध्यें जास्त मोकळी जागा मिळते. त्यामुळें या पाणबुडींत आम्ही अधिक आरामांत राहूं शकतों.

स्केटचे मूलभूत असे दोन भाग आहेत. मागचा इंजिनिअरिंग विभाग व पुढचा कंट्रोल विभाग व रहाण्याची जागा. जहाजाच्या अगदीं टोकाच्या भागांत टॉरपेडो–पाणतीर–असतात. ( स्केटवर नेहमीं बावीस टॉरपेडो असतात व ते नेहमीं सुसज्ज असतात. )

स्केटच्या अगदीं माध्यावर रिॲक्टर विभाग आहे. त्यांत युरेनियमयुक्त अणुभट्टी आहे. रिॲक्टरमध्यें खुजाच्या ( JUG ) आकाराचं, जवजजवळ वीस फूट उंचीचं पोलादाचं भांडं असतं. त्यांत कांहीं धातूंनीं युक्त अशा युरेनियम प्लेटस् असतात. शिवाय साधं पाणी भरलेलं असतं. त्या पाण्यावर इतका प्रचंड दाब असतो कीं तें उकळूं शकत नाहीं. ज्यावेळीं युरेनियममध्यें कंट्रोल दांडे विशिष्ट अवस्थेंत योग्य तऱ्हेनें वर उचलले जातात त्यावेळीं एक विशिष्ट प्रक्रिया होते व त्यामुळें सर्व युरेनियममध्य उष्णता निर्माण होते व ती उष्णता बाजूच्या पाण्यांत पसरते. नंतर हें पाणी स्टीम जनरेटरमध्यें जातं. इथं हें दाबयुक्त पाणी आपल्या उष्णतेपैकीं कांहीं उष्णता धातूच्या सहाय्यानें कप्पेबंद केलेल्या भिंतीपलीकडच्या पाण्याला देतें. हें दुसरं पाणी त्वरित वाफ बनतं व त्या वाफेनें टर्बाइन्सना गति मिळून जहाज पुढें हाकरलं जातं.

भट्टींत, दर कांहीं क्षणानंतर आंत घेतलं जाणारं व बाहेर फेकलं जाणारं दाबयुक्त पाणी हें अत्यंत ' रेडिओॲक्टीव्ह ' असतं. अर्थातच हें पहिलं पाणी आपली 'रेडिओ ॲक्टीव्हिटी' दुसऱ्या पाण्यांत सोडत नाहीं. ही सर्व 'रेडिओ ॲक्टीव्हिटी' एका कप्प्यांत बंदिस्त रहाते आणि तो कप्पा जस्ताच्या प्लेटस् आणि पॉलिथेलिन प्लॅस्टिकच्या पत्र्यांनीं सुरक्षित केलेला असतो.

मी कंट्रोल सेंटरमधून अणुभट्टी विभागांतील तीस फूट लांब असलेल्या बोळांतून पिछाडीला गेलों. भट्टी तक्तपोशीच्या खालीं आहे आणि वरती त्याचं अस्तित्व कळतं तें फक्त अवाढव्य सेंट्रिफ्यूगल पंपमधून फिरणाऱ्या दाबयुक्त पाण्याच्या आवाजानें. आसमंताच्या हवेंत पॉलिथेलिनचा मेघासारखा वास भरून राहिला होता. डेकवर असलेल्या पाहणी झरोक्यांपैकीं एकाचं झांकण मी वांकून उघडलं. माझ्याखालीं वीस फूट खोलीवर भरपूर उजेड असलेली अणुभट्टीची यंत्रयोजना मला दिसत होती. तिथलं सर्व कांहीं ठीक होतं. तें झांकण परत नीट लावून मी इंजिनरूममध्यें आलों. इथें दोन ' टरबाईन जनरेटर्स ' बसविलेले आहेत. आमच्या समुद्राखालील छोट्या विश्वासाठीं लागणारी वीज इथें तयार होते. ते जनरेटर्स म्हणजे या जहाजाचा प्राण आहे. तिथें तयार होणारी वीज केवळ दिव्यांसाठीं, जेवणासाठीं, गरम करण्यासाठीं किंवा हवा शुद्ध करण्यासाठींच उपयोगी पडते असं नव्हे तर अणुभट्टी नियंत्रित करण्यासाठीं व मुख्य शक्ति निर्मित केंद्र नियंत्रित करण्यासाठींहि उपयोगी पडते, जर का हे टरबाईन जनरेटर्स निरुपयोगी झाले तर ' स्केट ' म्हणजे एक निष्प्राण सांगाडा ठरेल.





अनुक्रमणिका

नंतर मी पाणबुडीच्या हालचाली नियंत्रित करणाऱ्या विभागांत मॅन्यूव्हेरिंग रूममध्यें-गेलों. इंजीन खोलीचा तो एक कोपरा होता. तिथं निरनिराळीं उपकरणं होतीं. आणि त्यांचं कार्य म्हणजे शक्तिनिर्मित केंद्राचें नियंत्रण करणें. तिथला अधिकार लेफ्टनंट बिल काडहिल यांजकडे होता. कंट्रोल पॅनेलपासून दूरवर मागें उभा राहून तो सर्व यंत्रें, न हल्तां एकसमयावच्छेदेंकरून पहात होता. बिल् हा सडपातळ, नौसैनिकांसारखें केस कापलेला तरूण असून शांत व कार्यक्षम आहे. त्याचा युनिफॉर्म नेहमीं कडक इस्त्रीचा, बिनसुरकुतीचा असतो. त्याचे बूट नेहमीं चकचकत असतात. नॉर्थ वेस्टर्न येथें त्यानें इंग्रजी वाङ्मयाची पदवी घेतली. नौदलामध्यें तो अधिकारी म्हणून राहिला. न्यू लंडनच्या अणु विद्यालयातून तो वर्गात दुसरा क्रमांक मिळवून पास झाला होता. मला पहाताच त्यानं मान हलविली व नंतर इंजिनिअरिंग लॉजवर सुवाच्च अक्षरांत पुष्कळशा नोंदी केल्या. ज्याप्रमाणें नियंत्रणकेंद्र सर्व जहाजाचा त्याचप्रमाणें-मॅन्यूव्हेरिंगरूम-हालचाल नियंत्रण विभाग-पंख्यांना चालना देणाऱ्या यंत्रणेचा-प्राण आहे. आणिबाणीच्या वेळीं म्हणजे आग लागली, नको तिथून वाफ येऊं लागली, बेसुमार पाणी आंत येऊं लागलं म्हणजे तें व्यवस्थित करण्यासाठीं इथं कितीतरी गोष्टी झटपट व यथायोग्य कराव्या लागतात त्यामुळं पुढें शक्तिकेंद्राला व म्हणूनच पाणबुडीला येणारा धोका टळतो.

पाणबुडीवरील सर्वांत वाईट प्रसंग म्हणजे पाणबुडीला धडकधक्का लागणें. पाणबुडीची बगल ही अशा धडकेंतून सहज चुरते आणि पाणबुडीची आंतील रचना अशी असते कीं अशावेळीं आतील एकालाहि बाहेर निसटतां येत नाहीं. अशावेळेसाठीं म्हणून पाणबुडीमध्यें एक धोक्याची घंटा असते. पाणबुडी मोडणार व बुडणार हें थोडावेळ अगोदर त्या धोक्याच्या घंटेनं कळविण्यात येतं. तो घंटानाद इतका भयंकर कर्णभेदी असतो कीं तो ऐकल्यानेंच एखाद्याच्या काळजाचा थरकाप व्हावा.

त्यानंतर जहाजाच्या अगदीं मागच्या टोकाला मी गेलों. तिथें टार्पेडोच्या नळकांड्यांच्या झडपा आहेत. त्याच्या दोन्ही बाजूला जादा टार्पेडो असून पंधरा खलाशांची झोपण्याची सोय आहे. पुढील एका कोपऱ्यांत विजेच्या सहाय्यानें चालणारें एक अद्यावत् धुलाईकेंद्र आहे. दुसऱ्या कोपऱ्यांत रेडिएशन संशोधन शाळा असून तिथें जहाजाचा वैद्यकाधिकारी, प्रत्येक खलाशानें वापरावयाच्या फिल्म बॅज, 'वाचून' पहात होता. डेव्हलपिंगनंतर फिल्म जितकी काळी दिसेल त्यामानानें ती वापरणाराला रेडिएशनची बाधा झालेली आहे असा त्याचा अर्थ. दातांसाठीं क्षकिरण घेतात तेव्हां आपल्या अंगात जितकं रेडिएशन भिनतें त्यापेक्षांहि कमी रेडिएशन 'स्केट'मधील जास्तीतजास्त रेडिएशन बाधलेल्या माणसाच्या बॅजवरून आढळून आलं, ही केवढी गमतीची गोष्ट !

घाईघाईनं पिछाडीचा एखादा टॉर्पेडो उडविणं हें स्केटला जमण्यासारखं नव्हतं हें सहज दिसणारं होतं. कारण त्या समोर एक सागरी भूगोलशास्त्राची संशोधन शाळा होती. रिकाम्या बाटल्यांचीं खोकीं होतीं. पाण्याच्या विविध नमुन्यासाठीं या बाटल्या लागत. समुद्राच्या पाण्यानें उजेड किती वक्र होईल हें मोजणारा स्पेक्ट्रोमीटर होता आणि इतर कांहीं किचकट यंत्रें होतीं. आणि या सर्वांच्यामध्यें सॅन डिओगोचा आमचा नागरी शास्त्रज्ञ डॉ. जीनलाफॉं होता. पन्नाशीच्या आसपासचा, सफेत केसाचा, हंसतमुख असा हा शास्त्रज्ञ आमच्या शनिवार-सायंकाळीं क्लबमध्यें पोकर खेळण्यांत दर्दी होता.

मी इंजीनरूममधून परत फिरलों व जहाजाच्या पुढच्या बाजूला गेलों. साध्या पाणबुडीचें तळमजला व पहिला मजला असे दोन भाग असतात. तळमजल्यावर सामान आणि वरच्या मजल्यावर माणसांचं वास्तव्य अशी त्याची सोय असते. पण अति मोठ्या अशा स्केटचे मात्र तीन भाग आहेत. एका मजल्यावर सामानसुमान व दोन मजल्यावर माणसांचं रहाणं. अगदीं वरचा मजला हा नियंत्रण केंद्र व ऑफीसर्ससाठीं आणि मधला मजला खलाशांचें जेवणघर, झोपण्याच्या जागा वगैरेसाठीं.

खलाशांच्या भोजनगृहांत सदासर्वदा वर्दळ असते. जेव्हां मी त्यांत शिरलों तेव्हां दहाबाराजण तिथं वाचीत, खेळत, अभ्यास करीत असे होते. भोजनगृहांत कोक मशीन आहे, संगीत श्रवणाची सोय आहे, स्वयंचलित आइस्क्रीम मशीन आहे आणि अर्थातच आरमारी जीवनांत अति आवश्यक असलेलं-पेय कॉफी त्याचीहि भांडीं आहेत.

प्रमुख टार्पेडोमन पॉल डार्नबर्गच्या बाजूला मी उभा राहिलों. हा गृहस्थ जहाजावरील नौ-सैनिकांचा मिलिटरी प्रमुख आहे.

'काय चीफ' मी विचारलं 'प्रत्येकाची सोय झाली आहे ना ?'

'कॅप्टन' तो म्हणाला 'आपल्या जहाजावर, नागरीक लोक धरून शंभरावर माणसं आहेत. त्यांतील तीस जण 'हॉट बंकिंग' या पद्धतीनं झोपतील. अर्थात् त्यांना आपण 'क्वीन मेरी' बोटीइतक्या आरामात नेण्याचं कधींच कबूल केलं नव्हतं म्हणा !'

'हॉट बंकिंग' ही नेव्हीमधली परिभाषा आहे. दोन इसमांनीं एका बिछान्यावर झोपणं अगर तीन इसमानीं दोन दोन बिछान्यावर झोपणं असा त्याचा अर्थ. जेव्हां तिघांपैकीं एकजण पहाऱ्यावर असतो तेव्हां दुसरे दोघेजण झोपी जातात. अर्थात् ही सर्वोत्कृष्ट सोय आहे असं नव्हे पण सर्वांचं सहकार्य असलं तर ती यशस्वी होते.

भोजनगृहातून मी गॅलीमध्यें गेलों. या बारा चौरस फुटांच्या खोलींत दररोजचीं तीनशें संपूर्ण जेवणं बनविण्याचीं सर्व साधनं आहेत. त्याशिवाय रात्रीं पहाऱ्यावर जाणाऱ्या किंवा तिथून येणाऱ्या लोकाना लागणारं इतर खाद्यहि इथंच बनविलें जातं. रे ॲटन हा इथला प्रमुख आचारी. शिजणाऱ्या डुकराच्या मासाचा मधूर वास येत होता. 'आजच्या जेवणासाठीं वाटतं!' त्यानं टोप उघडलेला पाहून मी विचारलं.

'होय सर. त्याबरोबर उकडलेले बटाटे आणि कॉलिफ्लॉवर आहे.'

जेवण तयार करणं हें रे ॲटनच्या पुष्कळशा कामापैकीं एक. पाणबुडी जरी कितीहि छोट्या प्रवासास निघाली तरी बरोबर साठ दिवसाचा शिधा घ्यावयाचा ही आरमारी पद्धत आहे. याचाच अर्थ ॲटेनला १८००० जेवणांचं साहित्य जमा करून ठेवावं लागतं. यासाठीं अर्थातच कांहीं बुद्धिमत्ता लागते.

ॲटेनला आणखी एक जबाबदारीचं काम असतं. जें जहाज समुद्रपृष्ठाखालून दिवसचे दिवस चालू असतं त्याला स्वयंपाकघरातील शिळपाकं वगैरे नको असलेलं साहित्य बाहेर टाकण्याचं कांहींतरी साधन हवं असतं. या खोलीच्या कोपऱ्यात एक चार फूट उंचीचें [illegible] नळकांडें आहे. त्याचा पृष्ठभाग प्रेशर-कुकरसारखा आहे,







अनुक्रमणिका

दिवसांतून पुष्कळदां नको असलेला कचरा नायलॉनच्या पिशव्यांत भरून या ट्यूबमधून खालीं टाकतात. जहाजाच्या तळाला एक दरवाजा आहे. तिथून या पिशव्या समुद्रांत फेंकल्या जातात. या नायलॉन पिशव्यांमध्यें विटेसारखी जड वस्तू घालतात. त्यायोगें या पिशव्या समुद्रपृष्ठभागावर न येतां तळाला जातात. युद्धकाळामध्यें शत्रूला आपली पाणबुडी कुठें आहे हें या तरंगत्या पिशव्यांवरून कळण्याचा धोका असतो. या कामासाठीं अॅटेनला १००० विटा साठवाव्या लागतात.

मी छोटया अरुंद वाटेनें खलाशांच्या शयनगृहांत गेलों. ३०X'१५' च्या या खोलींत ४१ इसमांसाठीं बिछाने आहेत. प्रत्येक बिछान्याला तीन बाजूंनीं लोखंडी पट्टया लावून इतरांपासून अलग केलेलं आहे. प्रत्येकाला एक रबरी गादी व उशी असते, डोक्यावर वाचण्यासाठीं दिवा असतो. इतक्या लोकांची ही खोली जर व्यवस्थित ठेवली नाहीं तर मग भलताच गोंधळ होईल. स्केटवरील ही व्यवस्था पाहण्याचं काम पॉल डार्नबर्गकडे आहे. त्यानें रे अॅटेन्सच्या माल साठविण्याच्या प्रश्नांतहि त्याला मदत केली आहे. या खोलींतील प्रत्येक बोळांत त्यानें विटांचा एक थर रचला आहे. त्यावर व्यवस्थित बसेल असं प्लायवूड कापून बसवलं आहे. पाणबुडीवरील लोकांची सामान सांठविण्यासाठीं जागा शोधण्याची धडपड महशूर आहेच पण मला कबूल केलं पाहिजे कीं जागेची बचत करण्याची ही पद्धत अभिनव होती–नेहमीपेक्षां निराळी होती.

आतां मी स्केटच्या पुढील भागांत–टॉर्पेडो खोलींत आलों. अगदीं लांब शेवटच्या टोकाला टॉर्पेडो ट्यूबचे दरवाजे आहेत. दोन्ही बाजूला चिराटाच्या आकाराचे टॉर्पेडोज पडलेले आहेत. या मोठ्या खोलींत वीस बिछाने आहेत. त्यापैकीं कांहींतरी टॉर्पेडोच्या मध्यंतरीच आहेत. इथला प्रमुख ज्यूलियन बकले. ताजातवाना दिसणारा, जाडजूड असा हा न्यू इंग्लंडचा मनुष्य. डॉक्टरच्या ऑपरेशन टेबलावर एखादा रुग्ण आणावा त्याप्रमाणें मि. बकले व त्याच्या हाताखालील माणसांनीं खोलीच्या मध्यावर एक टॉर्पेडो आणून तो ते उघडीत होते. आरमाराचं टॉर्पेडोविषयक तत्वज्ञान हें आरमाराच्या अन्नविषयक तत्वज्ञानासारखंच आहे. 'तयारींत रहा.' त्यांची वारंवार तपासणी करून ते कार्यक्षम आहेत याची खात्री करून घ्यावी लागते. बॅटऱ्या आणि हत्यारं घेऊन बकले व त्याचे सहकारी टॉर्पेडोच्या पोटांत खोलवर तपासणी करीत होते. मला वाटतें कीं टेबलावरील रुग्णाचं ऑपरेशन करतांना सर्जन कांहीं याहून जास्त चिकित्सा करीत नसावेत. अर्थात दोघांच्या भाषेंत फरक असेल.

'नमस्ते, काय म्हणतो तुमच्या माशांचा कळप ?' मी विचारलें.

'एवढ्यात सांगणं कठीण आहे.' बकले म्हणाला. 'पण कॅप्टन, पूर्वींच्या जमान्यासारखी काळजी हल्लींचे कारखाने घेत नाहींत.'

मी हंसलो. जगांतल्या अद्यावत् यंत्रांनीं सुसज्ज असलेली ही पाणबुडी–पण आरमारांत सर्वांच्याच खात्रीप्रमाणें 'जुनें तें सोनें' अशीच असतें.

मी मेसहॉलमधून मागें आलों. अशा नेहमीच्या शिड्यांच्या मानानें ऐसपैस, आणि भव्य जिन्यानं वर आलों तो ऑफिसर्स वॉर्डरूममध्यें. जवळ जवळ जेवणाचा वेळ झाला होता. टेबलावर निळी किनार असलेलें शुभ्र वस्त्र पसरलें होतें. त्यावर चकाकते रुपेरी काट्रेचमचे व आरमारानें शंभर वर्षांच्या परंपरेनें ठरवलेली निळ्या किनारीची चिनी मातीचीं पात्रें, असा सरंजाम दिसत होता. लौकरच आम्ही डुकराच्या मासाच्या सुरुचिर भोजनाचा स्वाद घेणार होतों. यावेळीं स्केट लीलया अठरा नॉटच्या गतीनं चाललं होतं. अटलांटीकच्या वादळी पृष्ठभागावरून तें तीनशें फूट खालीं होतं.

स्केट ही एक उत्कृष्ट पाणबुडी होती. मानवाची बुद्धिमत्ता आणि राष्ट्रीय दानशक्ति यांनीं जें जें देणं आहे तें सारं हिच्यांत आहे. पण आमच्या स्केटच्या पंख्याचं एकेक वर्तुळ पुरं होत होतं तसतसें आम्ही आमच्या ध्येयाच्या जवळ जात होतों. आम्ही अशा प्रदेशाच्या जवळ जात होतों कीं ज्यासाठीं ही स्केट बांधली नव्हती. हा प्रदेश स्केटच्या दृष्टीनं भरपूर धोक्यांनीं युक्त होता. आम्हांला माहीत आहे कीं स्केट आणि त्यावरील माणसंही आपले प्राण धोक्यांत घालीत आहेत. लौकरच त्यांना शांततेच्या काळांत यापूर्वीं कधींहि पत्करला नव्हता असा भयंकर धोका पत्करावा लागणार होता.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी माझ्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणें नॅव्हीगेशन चार्ट–जलप्रवाहाचा तक्ता पहिला. आदल्या रात्रौ स्केटनें किती प्रवास केला, कोणत्या मार्गानें केला हें तपासण्यासाठीं.

लेफ्टनंट कमांडर जॉन निकलसन. स्केटचा नाविक आणि दुय्यम कप्तान त्या चार्टवर वांकलेला होता. सहा फुटाहून जास्त उंची, रुंद खांदे, निळे डोळे आणि भुरभुरणारे तपकिरी केस. तो एखाद्या चित्रपटांतला नेव्हल ऑफीसर आहे कीं काय असं वाटे. त्यामुळें क्वचित् त्याची चेष्टाहि होते. पण इथें मात्र तो आपल्या देखणेपणापेक्षां आपल्या कर्तबगारीनेंच पुढें आला आहे. ॲनापोतिसच्या आरमारी विद्यापिठांत तो वर्गांत अगदीं वरच्या श्रेणीनें पास झाला होता; आणि रिकोव्हरनें अणुशक्ति प्रशिक्षणासाठीं प्रथम निवडलेल्या अधिकाऱ्यांपैकीं तो एक होता.

'निक' ची माझी प्रथम ओळख झाली ती याच संदर्भांत. नॉटिलसच्या समुद्रगमनाच्या फार पूर्वी इ. स. १९५१ मध्यें रिकोव्हर, पाणबुडीवाल्या आरमारी तुकडींतून वरिष्ट अधिकारी शोधण्याच्या खटपटींत होते. त्यांनीं ब्यूरो ऑफ पर्सनेलला (मी तिथं काम करीत होतों.) कळविलं कीं पाणबुडी पथकांतले दोन सर्वोत्कृष्ट अधिकारी मुलाखतीसाठीं पाठवा. वस्तुतः कामाचे हुकूम मिळण्यापूर्वीं अशा मुलाखती घेण्याची पद्धत नाहीं. पण रिकोव्हरच्या तुफानी व्यक्तित्वापुढें नियम बाजूला केले गेले आणि मुलाखतीसाठीं दोन अधिकारी रिकोव्हर यांचेकडे पाठविण्यासंबंधीं आम्हांला कळविण्यांत आलं. त्या दोन भाग्यवान अधिकाऱ्यांची निवड करण्याचं काम माझ्याकडं आलं.

मी माझी निवड कळविली आणि ते दोघे वॉशिंग्टनला हजर झाले. लौकरच ब्यूरोच्या प्रमुखाचा रिकोव्हर याचा फोन घणघणूं लागला. '...तुमच्याकडील लोकांपैकीं उत्कृष्ट असे पाणबुडीवर अधिकारी हेंच असतील तर मग मला आमच्या भवितव्याची चिंता वाटते.

'या शेऱ्यामुळें आरमार खात्यांत खळबळ माजली.' या विधानानें परिस्थितीचें वर्णन पुरेसें होणार नाहीं. टेनिसचा चेंडू जिन्यावरून खालीं घरंगळत जातांना जसा प्रत्येक पायरीवर आपटतो तसा 'या फजितीला जबाबदार कोण ?' हा प्रश्न वरून खालपर्यंत विचारला जाऊं लागला.

मी त्या दोन तरूण अधिकाऱ्यांचं रेकॉर्ड हातांत घेतलं आणि वरच्या ऑफीसमध्यें प्रवेश केला. माझी बाजू स्वच्छ होती। आमच्या







अनुक्रमणिका

पैकीं प्रत्येकाला माहीत होतं. कीं त्या दोन अधिकाऱ्यांपेक्षां कार्यक्षम असे आमच्याकडे कोणी नाहीं.

उमेदवारांची रांगच्या रांग रिकोव्हरकडे पाठविली जात होती. आठवड्या मागून आठवडे जात होते. सर्वांच्या बाबतींत निर्णय एकच येत होता. शेवटीं सर्व शांत झालं. रिकोव्हर आतां नाविक वैमानिकांची चांचणी घेत आहेत अशाहि अफवा सांगितल्या जाऊं लागल्या. विमान दलाचंहि नांव घेतलं जात होत.

नंतर एके दिवशीं प्रसन्न आवाजांत रिकोव्हर यांचा फोन आला कीं चांचणी घेतलेले पहिले दोन उमेदवार पसंत असून, आम्ही त्यांना त्याप्रमाणें लौकरांत लौकर पाठवून द्यावें. त्या दोन अधिकाऱ्यांपैकीं एक जॉन निकल्सन हा होता आणि आतां सात वर्षांनंतर स्केट हाकारण्याचं कठीण काम त्याच्या समर्थ हातांत सोपवलं गेलं होतं.

पाणबुडी हाकारणं ही नेहमीच एक अत्यंत अवघड आणि त्रासदायक गोष्ट असते. ध्रुवप्रदेशाकडील बर्फाखालून स्केट नेणं म्हणजे तर ज्याच्यावर उपाय सापडलेला नाहीं अशा संकटांना तोंड देण्याची पाळी. कोणतंहि जहाज चालविण्याची मूलभूत अशी दोन साधनं आहेत. त्या साधनांचा कोलंबसनें अवलंब केला आणि तो अटलांटिक पार झाला. जहाज कोणत्या गतीनं चाललं आहे व कोणत्या दिशेकडे चाललं आहे याच्या अचूक नोंदी करणारीं तीं साधनं आहेत. जेव्हां जहाज समुद्रावर असतं तेव्हां गती आणि दिशा अचूक नोंदली जात आहेत कीं नाहीं हें तपासण्यासाठीं दोन मार्ग आहेत; एक परंपरागत खगोल निरिक्षणावर आधारलेला आणि दुसरा मार्ग म्हणजे ' लोरान ' म्हणून ओळखली जाणारी इलेक्ट्रॉनिक पद्धती.

खगोल निरिक्षणावर आधारलेल्या पद्धतींत सूर्यासारखा एखादा पूर्वनिश्चित खगोल आणि दृश्यमान होणारं क्षितिज यांतील कोनाचं अचूक मोजमाप घेतलं जातं. आज कित्येक शतकं हा कोन सूर्ययंत्रानें-सेक्टनतें-मोजला जातो आणि नेहमीच्या सूर्ययंत्रानें हा कोन मोजायचा म्हटला तर निकल्सनला ' स्केट ' पृष्ठभागावर आणायला हवी. ही आवश्यकता टाळण्यासाठीं स्केटच्या एका पेरिस्कोप-मध्यें एक विशिष्ट यंत्र बसविलं आहे.

पुष्कळदां काळोख्या आणि वादळी रात्रीसुद्धां निकल्सन पेरिस्कोप-मधून हें मोजमापाचं काम शांतपणें करीत असलेला मी पाहिलं आहे. त्यावेळीं आकाशांतील तारे कधीं ढगाआड असतात, कधीं ढगाबाहेर असतात. पूर्वीच्या काळापेक्षां आतां हें कितीतरी निराळं. तेव्हां वादळी रात्रौ पाणबुडीच्या सारथ्याला डोलणाऱ्या ब्रिजवर उभं राहून आपला सेक्स्टंट सांभाळीत मोजमापे घेणें हें अतिशय त्रासाचें होतें.

जगाच्या निरनिराळ्या भागांत मनोरे बांधलेले आहेत. त्यावरून येणारे रेडिओ-सिग्नल पाणबुडीच्या यंत्रावर नोंदले जातात. पाण-बुडीच्या गतीमुळें आणि बदलत्या दिशेमुळें त्या सिग्नलसच्या वेळांमध्यें सूक्ष्म फरक पडतात. ते मोजून पाणबुडीची गति व दिशा निश्चित केली जाते. या पद्धतीला ' लोरान ' ( LORAN ) पद्धती म्हणतात. त्यासाठीं खास कोष्टकं आणि तक्ते तयार केलेले असतात. ध्रुवकेदार चाबका-सारखें टोक असलेली एक दांडी कांहीं क्षण पाण्याबाहेर धरली कीं हे रेडिओ सिग्नल पाणबुडीला पकडतां येतात.

क्रमशः

अनुवादक-श्रीकृष्ण ठाकूर



# साहित्यिकांचीं प्रेम प्रकरणें

सदानंद चेंदवणकर

**प्रेम** या विषयाची गोडी कांहीं अवीट आहे. प्रत्येक तरुण मनाचा ताबा या विषयानें घेतलेला असतो. या शब्दाच्या केवळ उच्चारानें व स्मरणानें तरुण मनाच्या हृदयांत अननुभूत अशा लहरी लहरून जातात. त्यांचे शब्दांत वर्णन करणें अशक्यच असतें. खरोखर प्रेम म्हणजे काय हें सांगणें जरा कठीणच आहे. प्रेम हें कसें, कुठें नि कुणावर बसेल याचा कांहीं नेम नि नियम नाहीं. प्रेमाचें पुरेपूर भरलें माप फारच थोड्या भाग्यवंतांच्या वांट्याला येत असतें. ते खरोखरच धन्य होत! प्रेम ही चीज संजीवनी आहे, अमृत आहे. अमृताचा एखादा थेंब माणसाला अमर करण्यास समर्थ होतो. तरुण मनाच्या वांट्याला जें अल्पस्वल्प प्रेम येतें त्यानेंहि त्याचें जीवन अमृतमय बनत असतें. जीवनांत त्याला स्वारस्य वाटूं लागतें. त्याला जगावेसें वाटतें नि कर्तृत्व करून दाखवावेसें वाटतें. एका प्रकारच्या अद्‌भुत् विद्युतशक्तीनें प्रेमांतली व्यक्ति भारली जाते. त्याची मुद्रा टवटवीत होते. अन् रडत राऊत हृदय चपळ वारूप्रमाणें ठेकेदार चालूं लागतें. आज जगांत ज्या साहित्यिकांनी आपल्यां लेखणीच्याद्वारां क्रांती करून अगणित रसिकांचें मन आपल्याकडे वेधून घेतलें आहे त्या साहित्यिकांनींहि प्रणयाचे खेळ खेळलेले आहेत नि इष्काच्या धुंदींत बहुमोल साहित्यनिर्मिती केली आहे हें वाचून तुम्हांस मोठें नवल वाटेल!

आंग्ल साहित्यांत आपल्या अलौलिक प्रतिभेनें साऱ्यांचें चित्त वेधून घेणारा महाकवि लॉर्ड बायरन यानें आपल्या अमर काव्यानें रसिकांना वेड लावलें आहे. या बायरनचें संपूर्ण नांव जॉर्ज गॉर्डन बायरन. वयाच्या बाराव्या वर्षी शिक्षणासाठीं त्याला हॅरो येथें पाठविण्यांत आलें. दोन वर्षांनीं जेव्हां सुटीच्या निमित्तानें तो परत घरीं आला तेव्हां त्याच्या शेजारीच रहाणाऱ्या मेरी ॲन चॉवर्थ नांवाच्या एका पोरीशीं त्याची ओळख झाली. ही मुलगी दोन वर्षांनीं त्याच्यापेक्षां मोठी होती. पण प्रेम आंधळे असतें म्हणतात ना! बायरनच्या मनांत तिच्याबद्दल प्रीति उत्पन्न झाली व ती त्याची हृदयदेवतां बनली. वास्तविक या छबेलीचें लग्न दुसऱ्याच एका इसमाशीं ठरलें होतें. बायरन आपल्यावर प्रेम करतो हेंहि तिला कळलें होतें परंतु तिनें सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष केलें व बायरनला राधन क्रीडेपासून परावृत्त करण्याचा कधींच प्रयत्न केला नाहीं. या प्रेम प्रकारामुळें भावी कालांत त्याच्या मनावर प्रतिकूल परिणाम होईल याची त्या बिचारीला काय कल्पना? पण अखेर जें व्हायचें तेंच झालें आणि बायनरच्या हृदयाला झालेली जखम पुढें भरून निघालीच नाहीं!! आपली प्रेयसी मेरी चॉवर्थ हिला उद्देशून त्यानें 'Tis done–and Shivering in the gale...etc' अशी एक कविता लिहिली आहे. त्यावरून मेरीबद्दल त्याच्या मनांत केवढें आकर्षण होतें, किती आत्मीयता होती याची सहज कल्पना येऊं शकेल. प्रथम प्रेमाचा तो खराखुरा आविष्कार होता. पहिल्या प्रेमाची अशी वाट लागली असली तरी 'प्रेमांत पडण्याचें' त्याला वरदानच होतें कीं काय कुणास ठाऊक? कारण त्यानंतर लेडी कॅरोलिन लँब, लेडी ऑक्सफर्ड व त्याची स्वतःची सावत्र बहीण आगस्टा अशा ओळीनें तिघांच्या प्रेमांत तो पडला आणि यानंतरच त्याच्या काव्याला खरा बहर आला. 'दि वॉल्टझ्', 'दि गेऊर इन मे', 'दि ब्राइड ऑफ ॲबिडॉस', 'दि कोरसेर', 'लारा', 'हिब्र मेलोडिज' अशी सरस व चित्तवेधक कवितांचीं पुस्तकें प्रसिद्ध करून साऱ्या रसिकांचें मन त्यानें आपणाकडे वेधून घेतलें.

इ. स. १८१५ त या प्रणयी वीरानें लेडी कॅरोलिन लॅम्बची चुलत बहीण ॲनाबेला मिलबॅंकी बरोबर विवाह केला. १८१३ त बायरननें याच मुलीला मागणी घातली होती परंतु ती धुडकावून लावण्यांत आली होती. अर्थात् हा विवाह म्हणजे बायरनच्या जीवनांतील एक फार मोठें गूढ







*प्रेमाची लज्जत कांहीं न्यारीच आहे. गुदगुल्या करणारा हा एक जिव्हाळ्याचा विषय, तितक्याच आकर्षकपणें लिहिलेला हा वाचनीय लेख......*

आहे. पत्नीबद्दल त्याच्या मनांत यत्किंचितहि आदर, प्रेम किंवा ओलावा नव्हता. तीं दोघे पती–पत्नी या नात्यानें रहात असली तरी त्यांत आस्था नव्हती आणि त्यामुळें त्यांच्या कौटुंबिक जीवनाचें अक्षरशः मातेरें झालें. १८१५ च्या डिसेंबरमध्यें त्याला या पत्नीपासून ऑगस्ट ॲडा नामक मुलगी झाली व त्यानंतर अवघ्या पांचच आठवड्यानंतर त्याच्या पत्नीनें आपल्या नवऱ्याला अखेरचा राम राम करून आपल्या वडलांच्या घरचा रस्ता धरला. नवरा आपल्याला छळतो या सबबीवर तिनें विभक्तिकरणाची मागणी केली. या दांपत्याची अशी फारकत कां झाली याबद्दल तत्काली खूपच चर्चा झाली व ती बरीच रंगली. परंतु खरोखरच काय झालें असावें याचा मात्र थांगपत्ता मुळींच लागला नाहीं व खरें रहस्य कांहीं बाहेर आलेंच नाहीं. या फारकतीमुळें बायरनवर मात्र चोहोंकडून हल्ला करण्यांत आला. वृत्तपत्रें, पत्रिका व जनता यांनीं तर त्याच्यावर कटु व वर्मी झोंबेल अशी जहरी टीका केली. यामुळें बायरन वैतागला व इंग्लंडचा अखेरचा निरोप घेऊन तो जिनेव्हा येथें गेला. तेथें त्याची विख्यात कवी पी. बी. शेले याचेशीं भेट झाली. या दोघां कवींचे स्वभाव भिन्न होते व इतर कित्येक बाबतींत मतभेद होते तरी त्यांची मैत्री जमली व ती पुढें वृद्धिंगत होत गेली. 'लेक जिनिव्हांत' प्रवाससौख्याचा आनंद लुटतां लुटतां बायरननें 'प्रिझनर ऑफ चिलॉन' लिहिलें. कांहीं काल हे दोघेहि कवी बरोबर राहिले. हिंडले, फिरले परंतु शेले पुढें इंग्लंडला गेला व बायरन एकटा राहिला. अखेर १८१९ त व्हेनीस येथें त्यानें आपलें बस्तान ठोकलें. तेथें त्याची व काऊंटेस टेरेसाग्यूसिओली या बाईबरोबर ओळख झाली व ती दोघेंहि एकत्र राहूं लागली. बायरनच्या या संबंधामुळें परत लोकांनीं गहजब करून त्याच्याविषयीं कंड्या पिकविल्या, काहूर माजविलें. अशा या प्रणयी बायरननें आपल्या दैदिप्यमान प्रतिभेनें सारें युरोपखंड उजळून टाकलें अन् साहित्यांत मानाचें असें अढळ स्थान प्राप्त करून घेतलें.

प्रेमभंगाचें दुःख काय असतें अन् त्यामुळें प्रेमवीराचें मन कोठल्या अमर्याद बिंदूपर्यंत भरकटत जाईल तें तत्सम प्रसंगांत पडल्याशिवाय किंवा सांपडल्याशिवाय कळणें महाकठीण ! आपल्या काव्यामुळें वाङ्मयांत अमर झालेला ख्यातनाम जर्मन महाकवी जोहान्स वुल्फगॅंग गटे हा सुद्धां प्रेमाच्या तापत्रयांत सांपडला होता. परंतु प्रेमाचा मार्ग कांटेरी असतो. त्याचा प्रेमभंग झाला व प्रेमभंगाच्या या दुःखाचा शेवट आयुष्याची इतिश्री करूनच करायचा असें त्याच्या मनानें ठरविलें. परंतु त्यानें आत्महत्या केली नाहीं. प्रेमभंगाचें दुःख विसरायला लावणारें एक नवें औषध त्या घटनेनें त्याला प्राप्त करून दिलें व तें म्हणजे लेखन ! गटे सुमारें २५ वर्षांचा होता त्यावेळची गोष्ट. शार्लोटी बफ नांवाच्या एका सुंदर तरुणीकडे तो आकर्षिला गेला. तिच्या सौंदर्यानें तो वेडा झाला व त्याला कशाचीहि शुद्ध राहिली नाहीं. पण शार्लोटीनें त्याला कोठल्याहि प्रकारचें उत्तेजन दिलें नाहीं. कारण ती अगोदरच त्याच्या मित्राच्या–कॅस्टनरच्या–प्रेमपाशांत सांपडली होती व लौकरच त्या उभयतांचें शुभमंगल देखील झालें. बिचारा गटे कुढतच राहिला. त्याचें हें पहिलेंच प्रेमप्रकरण होतें अन् पहिल्याच धडाक्याला त्याला सणसणीत आपटी मिळाली होती ! या दुःखानें त्याच्या मनांत आत्महत्येचे विचार जोरानें घोटाळूं लागले. पण शेवटीं मरूं घातलेल्या हृदयाला नवें संजीवन प्राप्त झालें. 'सॉरोज ऑफ वेर्थर' हें अप्रतिम सुंदर नाटक त्यानें लिहिलें तेव्हां कुठें त्याला समाधान झालें व त्याचें मनहि ताळ्यावर आलें. या नाटकांतील नायिकेसाठीं गटेनें आपल्या शार्लोटी या प्रेयसीच्या नांवाचा उपयोग केला होता हें विशेष होय. यावरून त्याच्या धीट व बेडर स्वभावाची कल्पना येते. या शार्लोटीला गटे लाडानें 'लोटी' म्हणून हांक मारीत असे. 'लोटी'ने जरी त्याला दूर लोटलें असलें तरी गटेवर अनेक स्त्रियांची भक्ति होती. कांहींचें त्याच्यावर प्रेमहि होतें. यःकश्चित् खानावळवाल्या पोरीपासून तो थेट सरदारकन्यका नि पत्न्यांपर्यंतच्या स्त्रिया त्याच्या प्रेमाची अभिलाषा करीत असत. अन् बॅरोनेस शार्लोटी व्हॉन स्टेन या एका बड्या अधिकाऱ्याच्या पत्नीचें अन् गटेचें प्रेमप्रकरण त्यावेळीं खूपच गाजलें होतें ! त्याचें हें प्रकरण जवळ जवळ दहा वर्षें टिकलें. या कालांत गटेने शार्लोटीला १७०० उत्कृष्ट अशी प्रेमपत्रें लिहिलीं. तीं सर्व तिनें जीवापाड जतन करून ठेवलीं. बॅरोनेस शार्लोटी व गटे एकमेकांवर शरीराभिलाषारहित प्रेम करीत असत हें विशेष होय. वयाच्या ५६ व्या वर्षी जेव्हां गटेनें ख्रिस्ती ॲनी व्हल्पायस नामक तरुणीशीं विवाह केला तेव्हां कुठें हें प्रेमप्रकरण संपुष्टांत आलें. ख्रिस्ती ॲनी ही अत्यंत हलक्या कुळांत जन्मास आली होती. गटेचा व तिचा संसार खूप दिवस सुरळीतपणें चालला. तिच्यापासून त्याला ऑगस्टस् नांवाचा मुलगा झाला होता. गटेशीं लग्न केल्यामुळें जरी तिच्या सामाजिक प्रतिष्ठेला स्थैर्य प्राप्त झालें असलें तरी तिचें वैवाहिक जीवन संपूर्णपणें अयशस्वी असेंच झालें. लग्नानंतर दहा वर्षांनीं तिचा अंत झाला. तिच्या मृत्यूचा धक्का गटेला चांगलाच जाणवला. त्याचें व तिचें जरी फारसें पटत नसे तरी तो तिच्यावर जिवापाड प्रेम करी.

विवाहित असतांना सुद्धां गटेची नारीसौंदर्याकडे बघून आकर्षित होण्याची शक्ति कांहीं कमी झाली नव्हती. वयाच्या ५८ व्या वर्षी त्याचे बेट्टीना ब्रेनटॅनो या छोकरीकडे लक्ष होतें. ती वयानें बावीस वर्षांची होती तरी ती अशी कांहीं वेषभूषा व केशभूषा करी कीं आपण तेरा वर्षांचेंच आहोंत असें गटेला ती भासवीत असे व त्याला आपल्या जाळ्यांत ओढण्याचा प्रयत्न करी. वयाच्या ६५ व्या वर्षी गटेची नजर आपल्या एका मित्राच्या मुलीवर खिळली होती. तिचें नांव मारी ॲनी विल्येमर ती त्याची कित्येक महिने गुप्त प्रेयसी होती. ख्रिस्ती ॲनीच्या मरणानंतर त्यानें तिला कायदेशीर पत्नी करून घेतली. या पत्नीबरोबर कांहीं काळ मजेंत घालविल्यावर वयाच्या ७४ व्या वर्षी १९ वर्षांच्या उलरूका व्हॉन लेविटझरे या तरुणीबरोबर विवाह करण्याचा त्याचा विचार होता. गटेच्या शरीराचा एकंदर रुबाबदारपणा व त्याचें असामान्य तेज त्याला केव्हांहि तारुण्यांत अगर वार्धक्यांत सोडून गेलें नाहीं. अशा गटेनें शेवटपर्यंत रसिकांना आपल्या असामान्य प्रतिभेनें भुलविलें अन् झुलविलें.

ऐतिहासिक कादंबऱ्याचा निर्माता म्हणून सर वॉल्टर स्कॉट या थोर आंग्ल साहित्यिकाकडे







घोट दाखविलें जातें. कवि म्हणुन तर त्यानें अल्पावधींतच ख्याति मिळविली. त्यानें लिहिलेल्या प्रणयी कथा तर पुन्हां पुन्हां वाचाव्याशा वाटतात. या स्कॉट साहेबाची प्रेमकहाणी शोकरसपूर्ण आहे. उत्तम प्रकृतीच्या नि बांधेसूद देहयष्टीच्या अशा वॉल्टरचें १९ व्या वर्षी विल्यामिना स्टुअर्ट बेल्चस् या सुस्वरूप तरुणीवर प्रेम बसलें. ती जॉन स्टुअर्ट बेल्चसची मुलगी. तिच्याशीं खूप खूप प्रणयी चाळे केल्यावर ती आपल्याशींच विवाहबद्ध होईल अशी वॉल्टरची खात्री झाली होती. पण रमणीच्या मनाचा ठाव घेणें फार अवघड काम आहे नाहीं! विल्यामिनाने वॉल्टरला चांगलेंच डावललें नि तिनें सर विल्यम फोर्बस या तरुणाबरोबर लग्न केलें. वॉल्टरला तर वेड लागायची पाळी आली. परंतु त्यानें शहाणपणा करून कसाबसा मनाचा तोल सावरला. या घटनेनंतर अवघ्या वर्षभरांतच एका फ्रेंच निर्वासिताची सांवळीशी यौवना त्याला भेटली. तिचें नांव चार्लोटी मेरी कारपेन्टर. चार्लोटीबरोबर इष्काचे खेळ खेळून अखेर शेवटी तिच्याबरोबर १७९७ च्या नाताळांत त्यानें विवाह केला. त्याचा हा विवाह यशस्वी व सुखावह झाला व वॉल्टर सुद्धां तिच्याबरोबर निष्ठेनें राहिला असला तरी त्याला लिहिण्याचें वेळेस विल्यामिनाचें तीव्रतेनें स्मरण होई. 'रोकबी', 'ले ऑफ दि लास्ट मिंनस्ट्रल', 'रेड गॉंटलेट' या त्याच्या काव्यकलाकृतींतून त्याला त्याच्या प्रेयसीची आठवण दृगोचर झालेली दिसून येते.

सुविख्यात कवि विल्यम ब्लेक याचे पॉली वुड या एका रसरशीत गोंडस युवतीवर प्रेम जडलें. परंतु या चमेलीला चारचौघांत खूप मिसळण्याची नि हंसण्या–खिदळण्याची भारी आवड. कित्येकदां ती या बाबतींत मर्यादा पण सोडायची! ब्लेकनें तिच्याशीं झालेला परिचय हळूहळू वाढविण्यास सुरुवात केली नि एकदां संधि साधून मागणी घातली. परंतु ती गोष्ट तिनें हंसण्यावारी नेली. भावनाप्रधान ब्लेकला ही गोष्ट सहन झाली नाहीं. त्याचें डोकें फिरलें व विश्रांतीसाठीं तो बॅटरसी या ठिकाणीं गेला. तिथें विल्यम बुचर या एका माळ्याच्या घरीं त्यानें आपलें बस्तान ठोकलें. परंतु तिथें त्या माळ्याची पोरगी कॅथराईन हिच्यावर त्याचें प्रेम बसलें. ती मोठी विनयशील, सुस्वभावी व शांत पोरगी होती. पहिल्याच दृष्टिभेटींत तीं दोघे एकमेकांकडे आकर्षिली गेलीं. कॅथराईननें तर आपला भावी पति म्हणून त्याला आपल्या हृदयांत धरलें. ब्लेकनें आपली विफल प्रेमकहाणी तिला ऐकवली. ती कथन करीत असतांना तिच्या चेहऱ्यावर होणाऱ्या सूक्ष्म फरकांकडे त्याचें लक्ष होतें. कहाणी सांगितल्यावर तो सद्गदित होऊन म्हणाला, 'तुला माझी दया येते का?' 'होय अवश्य' तिनें उत्तर दिलें व तिच्या या उत्तराबरोबरच ब्लेकने 'आय लव्ह यू' म्हणून तिला जवळ घेतलें. ता. १८ ऑगस्ट १७८२ रोजीं ब्लेकनें कॅथराईनबरोबर प्रीतिविवाह केला व त्यानंतर ब्लेकच्या काव्यनिर्मितीला भरती आली. कॅथराईन तनमन खर्च करून ब्लेकला भरपूर मदत करत असे.

ज्याचें नांव घेतलें असतां जागतिक वाङ्मय सृष्टींतील लोकांची मान लवते व ज्यांच्या वाङ्मयाबद्दल आणि मोठेपणाबद्दल साऱ्याच मानवजातीला अभिमान वाटतो अशा लोकांपैकीं एच. जी. वल्स हे एक होत. वेल्स शाळेंत शिक्षक असतानांची गोष्ट. त्या शाळेंतल्याच एका विद्यार्थिनीला त्यानें आपलें हृदय अर्पण करून टाकलें. त्या विद्यार्थिनीचें नांव कॅथराइन रॉबिन्स. वर्गांत धडा शिकवितांना अनेकदां वेल्सला आढळून आलें कीं आपलें लक्ष पुस्तकाकडे नसतें तर कॅथराईनकडे असतें व या साऱ्या गोष्टीचा परिणाम म्हणजे कॅथराईन रॉबिन्स 'मिसेस एच. जी. वेल्स' झाली.

आंग्ल कविवर्य कीटस् हा फॅनी ब्राऊन या पोरीवर फिदा झाला होता. ही सुंदरी आपली कशी होईल हा एकच एक विचार त्याच्या मनांत सारखा घोळत असे. कीटस् व फॅनी शेजारी शेजारी रहात असत. यामुळें सहाजिकच परिचय झाला व त्या परिचयाचें पर्यवसान पुढें प्रेमांत झालें. त्यावेळीं म्हणजे १९१८ मध्यें कीटस् हा २३ वर्षांचा होता. चांगली कमाई होईल असा कोणताही उद्योग तो तेव्हां करीत नव्हता. किंवा पुढेंमागे तो उत्तम कमाई करील असाही संभव नव्हता. त्यामुळें फॅनीची त्याच्याशीं लग्न करण्याची मुळींच इच्छा नव्हती. येऊन जाऊन किटस्नें सामर्थ्य फक्त त्याच्या काव्यलेखनांतच काय तें दिसून येत असे. पण काव्यरस पिऊन माध्यान्हाची भ्रांत टळत नाहीं हें कळण्याइतकी उपजत बुद्धी फॅनीसारख्या स्त्रींत नेहमींच वास करीत असते बरं! शिवाय असं कीं कीटस् हा थोर कवि होता कीं आहे हेंच मुळीं फॅनीला पटत नव्हतं. त्याचं कांहीं लिखाण प्रसिद्ध न करतां तसंच पडूं द्यावं असं म्हणण्याइतकीं तिची मजल गेली होती. तो मातबर कवि वाटत असला तरी फॅनीला कांहीं तसा साक्षात्कार घडला नव्हता. अन् व्यावहारिक दृष्टीनें तो तिला अगदींच निरुपयोगी वाटत होता. यामुळें फॅनीनें त्याच्याशीं विवाहबद्ध होण्याचें टाळलें, पण प्रेमरसाचे अनेक घुटके मात्र घेतले. त्याच्या प्रेमपत्रांचीं असंख्य छायाचित्रें विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं कॅलिफोर्नियांतील हरिंगडन म्युझियममध्यें ठेवलीं आहेत.

कविश्रेष्ठ विल्यम वर्डस्वर्थ हा सोवळा कवि मानला जात होता. परंतु १९२२ सालीं त्याचें एक प्रेमप्रकरण उजेडांत आलें. हें प्रेमप्रकरण इतकें पुढें गेलें होतें कीं त्या संबंधापासून वर्डस्वर्थला एक मुलगीहि झाली होती!! ही माहिती दीर्घकाल जगासमोर आली नव्हती पण ही बातमी साधार सिद्ध होऊन चव्हाट्यावर आली आहे. याच वर्डस्वर्थनें अत्यंत चावट कविता लिहिल्या आहेत असाहि त्याच्यावर आरोप करण्यांत येतो. स्वतः वर्डस्वर्थनें आपणांकडून आपल्या प्रेमप्रकरणाचें गोपन कधींच केलें नाहीं. म्हणून दीर्घकालपर्यंत त्याचें हें इष्क प्रकरण गुलदस्तांतच राहिलें असावें.

विश्वविख्यात महाकवि डॉंटेचें नांव कुणास माहीत नाहीं! प्रणयप्रधान कविता लिहिणाऱ्या या कविनेंहि प्रेमाचे खेळ भरपूर खेळले आहेत नि त्याचें बरेंचसें लेखन प्रेमांत असतांनाच लिहिलें गेलें आहे. वयाच्या अवघ्या ९ व्या वर्षींच स्वारी बेट्रीस पॉरटीनेटी या एका उच्च घराण्यांतील पोरीच्या फंदांत पडली. त्यानें लिहिलेल्या 'व्हिटान्योव्हा' (नवें जीवन) या सर्वस्वी तिलाच अर्पण केलेल्या कवितेंतून त्यानें तिचें फार बहारदार वर्णन केलें आहे. त्याचें तिच्यावर खरेंखुरें प्रेम होतें. त्यानें आपल्या 'डिव्हाईन कॉमेडी' व 'अर्थली पॅरडाइज' काव्यांची रचना बेट्रीसवर प्रीतीसुमनें उधळीत असतानांच त्यानें केली. आज जगांतील उत्कृष्ट काव्यांत या काव्यांची गणना करण्यांत येते. बेट्रीसच्या विरहानें तो आजारी सुद्धां पडला होता. परंतु खरें प्रेम नेहमीं पायदळी तुडविलें जातें कीं काय कुणास ठाऊक? बेट्रीसने सायमन डी बार्डी या इसमाशीं विवाह केला व अल्पावधींतच ती परलोकी गेली. तिच्या दुःखानें विव्हल होऊन डांटेने 'कॉनव्हिटो' (गुच्छ) ही एक शोकरसपूर्ण पण उत्कृष्ट कविता लिहिली. हृदयविदीर्ण

झालेल्या डांटेनें अखेरीस जिम्मा डोनाटी या स्त्रीबरोबर विवाह केला. डांटे इतक्याच प्रसिद्ध असलेल्या शेलेनें सुद्धां प्रेमराज्यांत स्वैर संचार करून अनेक लफडी उपस्थित करून ठेवली होती.

'ट्रेझर आयलंड' 'जेकिल अॅण्ड हाईड', 'ट्रॅव्हल्स् विथ ए डाँकी', 'अॅन इनलंड व्हॉयेज' इत्यादि ख्यातनाम पुस्तकांचा कर्ता म्हणून रॉबर्ट लुई स्टीव्हनसन याला जग ओळखतें. पण स्टीव्हसनसाहेब कॅलिफोर्नियाला गेले असतांना त्यांची फॅनी ओसबर्न नांवाच्या एका अमेरिकन स्त्रीशीं ओळख झाली व तिचेंच पुढें प्रणयांत रूपांतर झालें. ते तिजवर इतके मोहित झाले कीं प्रेमाचा वर्षाव करीत असतांनाच त्यांनीं तिच्याशीं १८८० त लग्न करून टाकलें. पुढील काळांत फॅनी स्टीव्हनसन हिनें पत्नी व सेविका या दोन्ही नात्यांनीं त्याची मनोभावें सेवा केली. या विवाहानंतर स्टिव्हन्सनच्या लिखाणास भलताच वेग चढला.

रोमिओ आणि ज्युलिएटसारखे भावनाविवश व उतावीळ प्रेमिक आहेत हे लिहिणारा, लिथरसारखे संतापी व अहंकारी राजे आहेत हें सांगणारा, दिराबरोबर व्यभिचार करणारी हॅम्लेटची आई आहे याचा रहस्यभेद करणारा, महत्त्वाकांक्षेच्या पूर्तीसाठीं स्वामिद्रोह करणारा मॅक्बेथ आहे हें कथन करणारा, जगश्रेष्ठ नाटककार आणि कवि विल्यम शेक्सपियर याचा सर्वत्र आदर केला जातो. या शेक्सपियरची प्रेमकहाणी मोठी रंजक आहे. ऐन तारुण्यांत शेक्सपियरचे अॅनी हॅथवे या युवतीवर प्रेम बसलें. दिवसाचा बराच काल तो तिच्याबरोबर असे. ती यौवनासुद्धां त्याच्यावर फिदा होती. तिच्याबरोबर प्रेमाचे चवचाल चाळे, थिल्लरपणा केल्यावर विल्यम अॅनी म्हातारी झाली असे दुसऱ्या एका तरुणीवर प्रीतिसुमनें उधळूं लागला. आपला प्रियकर दुसऱ्या एका ललनेच्या प्रेमपाशांत सांपडला आहे. इतकेंच नव्हे तर तो तिच्याबरोबर विवाहबद्धहि होणार आहे ही गोष्ट अॅनी हॅथवेला कळतांच तिला अपरंपार दुःख झालें. तिला कांहीं सुचेना. शेवटीं हतबद्ध होऊन ती शेजाऱ्या पाजाऱ्यांच्या घरीं जाऊन मुळूमुळू रडूं लागली. तिच्या अश्रूधारांचा त्या शेजाऱ्यांवर इतका परिणाम झाला कीं लागलीच दुसऱ्या दिवशीं त्यांनीं शहरांत जाऊन शेक्सपियर-हॅथवे यांच्या विवाहबद्धतेचीं भित्तीपत्रकें ठिकठिकाणीं डकवून दिली आणि मजा अशी झाली कीं त्यामुळें हॅथवे बरोबरच विल्यमला विवाहाचा केक कापावा लागला.

आंग्ल काव्यांत या शेक्सपियरच्या सुप्रसिद्ध सुनीतां (सॅानेट्स) मधून ब्लॅक लेडीनें जितकें कुतूहल निर्माण केलें आहे तसें आमच्या राम गणेश गडकरी ऊर्फ बाळकरामांनीहि आपल्या काव्यसुमनांतून उत्पन्न केलें आहे. 'प्रेमशाहीर' ही पदवी आधुनिक कवींत गडकऱ्यानांच प्रथम लाभली हें सर्वश्रुतच आहे. गोविंदाग्रजांच्या काव्यांतून ठायी ठायी आढळणारी ही हृदयशारदा कोण, आहे माहीत? गडकऱ्यांचा पहिला विवाहसंबंध अत्यंत निराशाजनक ठरला. त्यांचें तें वैवाहिक जीवन 'निष्प्रेमाची शेजसोबती' या उदास पद्धतीचें होतें त्यानंतर गडकऱ्यांचे मामा श्री. रंगराव (रंगूमामा) वारकर देशपांडे यांची उपवर कन्या चंपा देशपांडे हिच्याकडे लालजींचें लक्ष वेधलें यांत नवल नाहीं. चंपावती ही जात्याच बुद्धिमान, हुशार, अत्यंत रसिकवृत्तीची व दिसावयास अत्यंत सुंदर असल्यानें आपणांस ही सहधर्मचारिणी लाभल्यास आपलें जीवन सार्थकीं लागेल अशी त्यांची मनोदेवता त्यांना सांगूं लागली. लालजी तिच्या सहवासांत रमूं लागले. सारांश गडकऱ्यांची हृदयदेवता ती हीच. परंतु दैवदुर्विलासानें या प्रेमप्रकरणांत शब्दसृष्टीचा हा कुबेर अयशस्वी झाला. त्यांची ती प्रियतमा उरवडेकर पोतनीस घराण्यांत पडून विवाहोत्तर थोड्याच दिवसांत स्वर्गवासी झाली. 'हृदयास', 'गोफा', 'फणसाचें पान', 'निर्दय बालेस', 'शेवटचें प्रेमगीत' या कविता वाचकांनीं वरील संदर्भांत वाचून पाहिल्यास प्रेमभंग झालेल्या महाराष्ट्राच्या या सुविख्यात नाटककाराच्या जीवनपटाचें दारुण चित्र मनःश्चक्षुंपुढें विदारकपणें उभें रहातें. त्यांच्या 'शेवटचें प्रेमगीत' यामध्यें

तुटे स्नेह संबंध सर्वस्वी आतां।
टाकितां तूं असें या अनाथा।
सात वर्षें सख्ये। हृपद् स्वप्न जें।
पाहिलें भोगिलें तेंच आतां॥

या ओळी वाचल्यावर पुढील आर्त विलाप पहा—

यत्न केले सख्ये। रत्न तुजसारखें।
कधींतरीं व्हावया प्राप्त होतां॥
अन्य घटनापरि ना कळे कां करी।
देव कीं दैव कीं तो विधाता॥

निर्दय बालेस उद्देशून गोविंदाग्रज लिहितात—

दिली तिलांजली अश्रूंची ही
त्या प्रेमाच्या नांवा।
परतायाचें नाहीं आतां
त्या प्रेमाच्या गांवा॥
होईल होईल वाटत होतें
तेंच अखेरीस झालें।
नांव घेतल्यावांचून आतां
मनांत झुरणें आलें॥

बाळकरामांच्या या प्रेमयज्ञाचा शेवट शोकपर्यवासी झालेला वाचून रसिक व हळव्या वृत्तीच्या कुणाहि वाचकाला त्यांच्या दुर्दैवी जीवनाबद्दल सहानुभूतीच वाटेल.

पान ३६ वर...










*नवकाव्याच्या अभ्यासकांना प्रतिभा-वादाइतकाच कलामूल्याचाहि अभ्यास करणें आवश्यक आहे. नवकाव्य हा एक गंभीर विषय. त्याचें सखोल चिंतन झालें नाहीं तर नवकाव्याचें भवितव्यच धोक्यांत आहे.......*

# नवकाव्याचें अंतरंग

—सदा कऱ्हाडे

'**नवकाव्य**' हा सामान्य वाचकांच्या सहानुभूतीचा किंवा जिव्हाळ्याचा विषय अजूनपर्यंत तरी होऊं शकत नाहीं. नवकाव्य म्हटलें कीं सामान्य वाचक एकतर अजाण निष्पाप मुलासारखा बुजतो किंवा यांत कांहीं विशेष नाहीं अशा समजुतीनें नवकाव्य बाजूला सारतो. नवकाव्य हें दुर्बोध असतें, अश्लील असतें, विकृत असतें, बोंगट असतें अशा गैरसमजुती नवकाव्याविषयीं वाचकांच्या मनांत रुजलेल्या आहेत आणि त्याचा परिणाम असा होतो कीं सामान्य वाचक नवकाव्याच्या वाटेस जात नाहीं.

नवकाव्याच्या अंतरंगाविषयीं अधिक विवेचन करण्यापूर्वी एक मुद्दा स्पष्ट केला पाहिजे. 'नवकाव्य' हा शब्दच मला वाटतें अत्यंत फसवा आणि तोकडा आहे. वास्तविक युद्धोत्तर कालांतील जी कविता, ती नवकाव्यांत अभिप्रेत आहे. 'नव' या शब्दांत नाविन्य (Novelty) अभिप्रेत असली तरीहि त्याच्या एकंदर स्वरूपांत आधुनिकत्वाला विशेष प्राधान्य आहे. त्यादृष्टीनें नवकाव्य हा आधुनिक काव्याचा (modern poetry) पर्याय म्हणून मान्य करणेंच सोयीचें ठरतें. परंतु त्यांत थोडा गोंधळ असा निर्माण होतो कीं केशवसुतानंतरच्या काव्यांत म्हणजे युद्धपूर्व काव्याला आपण आधुनिक कविता असें पूर्वींच संबोधलें आहे; आणि आतां युद्धोत्तर कालांतील कवितेला आधुनिक कविता म्हटलें तर दोन्ही कालखंडांतील काव्याच्या स्वरूपांचा विचार–तौलनिक विचार–करणें किंचित् गोंधळाचें होईल. वास्तविक केशवसुतांपासून आतांपर्यंतच्या कवितेला आधुनिक म्हणून केशवसुत संप्रदाय आणि मर्ढेकर संप्रदाय असे दोन संप्रदाय मानावे. कारण वाङ्मयाच्या अभ्यासाच्या दृष्टीनें विचारांचें संप्रदाय हेंच सोयीस्कर पडतात.

युद्धोत्तर कालामध्यें समाजाच्या एकंदर प्रकृतीच आमूलाग्र बदल झाला. माणसाची स्वतःच्या जीवनावरील श्रद्धाच जणूं नाहीशी झाली. मानवी जीवनांत यंत्रानें जो नवा अवतार घेतला होता त्याचें भेसूर आणि राक्षसी स्वरूप युद्धोत्तर कालांत अधिक स्पष्ट होऊं लागलें. समाजजीवनामध्यें व्यक्तिजीवनाला महत्वपूर्ण स्थान असतें. समाजजीवन आणि व्यक्तिजीवन हें अन्योन्याश्रयी व अन्योन्यपोषक आहेत. परंतु महायुद्धाची मोठी प्रतिक्रिया जर कोणती झाली असेल तर ती ही कीं व्यक्तिवादाचें अस्तित्वच संपुष्टांत आलें. यांत्रिक युगाचा भीषण अवतार, सामाजिक विषमता आणि सत्तासमूह या तिहींच्या कोंडींत व्यक्तीची गळचेपी होऊं लागली.

यंत्रावलंबी झालेला माणूस हा स्वतःच जणूं एक यंत्र बनला. निदान मानवी जीवनांतील उदात्ततेच्या आणि सत्य, सौंदर्य, सौजन्य, शिव यांचा शोध घेणाऱ्या कलावंतांना तर हें अधिक तीव्रतेनें जाणवूं लागलें आणि यांत्रिक युगांतील अगतिक मानवाचें वास्तव चित्रण करण्याचा प्रयत्न युद्धोत्तर काळांतील कवींनीं केला, आणि या प्रयत्नांतूनच काव्याचें स्वरूप बदललें. काव्यांत वेगळ्याच प्रकारचा वैफल्यवाद शिरला.

आजच्या यंत्रयुगांतील मानवाचें वास्तव चित्रण—

**'भूकंपाचा इकडे धक्का पलीकडे अन् युद्ध नगारे**
**चहूंकडे अन् एकच गिल्ला जुन्या शवांवर नवे निखारे'**

असें ज्यावेळीं मर्ढेकर म्हणतात तेव्हां त्यांना जीवनांतल्या एका कटु सत्याची जाणीव झालेली असते. आजचें जगणें हें एकप्रकारचें मरणच आहे. आजच्या माणसाला मरत मरत जगावं लागतं आणि या अशा जगण्यांतलें दुःख मोठें विलक्षण आहे.

**माणुसकी झिजून झिजून मरते**
**क्षयानें झिजल्या देहासमान**
**सौन्दर्य जळून कुरूप बनतें**
**देवींनीं डागल्या चेहऱ्यासमान**

असें शरश्चंद्र मुक्तिबोध जेव्हां म्हणतात तेव्हां ही जाणीव अधिक तीव्र झालेली दिसते. 'माणसाचें जीवन म्हणजे एक पुष्ट असें कोळ्याचें जाळें आहे.' सुकुमार मानवांचा चोळामोळा झालेला आहे...आणि त्यामुळें माणसाची दांनतच जणूं बिघडलेली आहे... 'नारी माता दिसे











अनुक्रमणिका

ध्येयांत शोभून । मूठ धान्य घ्या अन् सांडी घ्या फेडून । ( मुक्तिबोध ) अशी आतां माणसाची नीति उरली आहे. ' माणसाच्या जीवनांत आणि नरकांत फरक' म्हणून उरलाच नाहीं; आणि अशा या नरकतुल्य जीवनांत माणसाचें अस्तित्व तरी काय ?

उभा गर्दभ विचारमग्न
भार वाहून झालेला भग्न । (मुक्तिबोध)

हें आजच्या अगतिक मानवाचें वास्तव चित्रण आहे. अन् अशा यंत्र-दुर्बळ मानवाविषयीं कवीचें हे उद्गार आहेत.–मानवा मानवा। काय ही स्थिति । किड्यांचें मरण...' यंत्रयुगानें मानवाला अतिशय क्षुद्र बनवलें आहे. इतकें क्षुद्र; किड्यामुंग्याहूनहि क्षुद्र; ' ही एक मुंगी ती एक मुंगी । तो एक मुंगी हा एक मुंगी ' असें मर्ढेकर म्हणतात त्यामागें हीच जाणीव आहे.

मानवाच्या अगतिकतेची ही जाणीव कमीअधिक प्रमाणांत सर्वच कवींना झालेली आहे. ' पहिली मानवता । पोलादी कणांची । जीवनाच्या ॲसिडांत विरघळून जातांना ।...जुनाट जात्यावर दळीत बसलेली । आपल्याच हातांनीं आपल्याच पोरांना' ही विंदा करंदीकरांना झालेली तीव्र जाणीव आजच्या मानवाची अगतिकता, असहाय्यताच व्यक्त करूं पाहते. ' पिळलेल्या पोटामधल्या अग्नीची ज्वाळा करंदीकरांना दिसलेली आहे. आणि पोटतिडीकीनें त्यांनीं लिहिलें आहे.

इथें कांहीं वाचक अशी शंका घेतील कीं हें कांहीं 'नवकाव्य' नाहीं. पण मी सुरुवातीस लिहिलें आहे कीं नवकाव्य ही कल्पनाच मुळीं फसवी आहे. युद्धोत्तर कालांतील अत्याधुनिक काव्याचें अंतरंग आपल्याला पहावयाचें आहे.

या 'वास्तव चित्रणा'ची मर्यादा इथंच संपलेली नाहीं. माणूस हा क्षुद्र आहे ही जाणीव झाल्यानंतर जीवनाच्या उदात्ततेच्या, सौजन्याच्या, सौंदर्याच्या साऱ्या पाकळ्याच गळून पडल्या आणि उरलें फक्त एक भोगासक्त विकृत व्यक्तीत्व.

जशी पाप्याची नजर फिरावी
अनोळखीच्या उरावरूनी
ह्या साऱ्यांची भेकड वृत्ती
वावरते तशी जगण्यामधुनी (मर्ढेकर)

क्षुद्रत्वच तेवढें शिल्लक उरलें, त्यामुळें ' पापी नजर आणि भेकडवृत्ती ' याशिवाय जणूं माणसाच्या व्यक्तित्वाची कोणतीच निशाणी उरलेली नाहीं. भोगासक्ति म्हटली तरी त्यांतहि एकप्रकारची शून्यता आणि व्यथा. कारण यंत्र-राक्षसानें माणसाला इतकें दुर्बल करून टाकलें आहे कीं सौंदर्याची आसक्ति देखील माणसाला उरलेली नाहीं.

यंत्र आहे मी, प्राण यांत्रिक, अगतिक वळी परिस्थितीचा
चोवीस तास गुलाम आहे मानवनिर्मित महायंत्राचा
तुझ्यापासून, फुलापासून, प्रीतिपासून निर्वासित मी
ह्रदयीं धूळ, केवळ धूळ ! शुष्क जळून जहालेलों मी
काय करूं गे !......( मुक्तिबोध )

स्वतःच्या व्यक्तिजीवनांतच माणूस निर्वासित झालेला आहे. मग सौंदर्याचा आस्वाद तरी तो काय घेणार ? आणि अशा जीवनांत सौंदर्य तरी कुठें उरलें आहे ? माणसाच्या सौंदर्यवृत्तीला आवाहन देणाऱ्या स्त्रींत तरी आतां सौंदर्य कुठें उरलें आहे ?

एकच होती ऐशी नकटी
उलटे केस आणि तिरप्या भुवया
मिरवित अपुले उरोज उन्नत
ढेपा जैशा तेल्याघरल्या (मर्ढेकर)

आणि पिचलेल्या या जीवनांत ' भोगशून्य भोगव्यथेचें ' आणि ' लिंग-गंडाचें ' प्रच्छन्न प्रदर्शनच प्रत्ययास येत असल्यामुळें, जीवनाविषयींचा उबग निर्माण होतो आणि हा उबग मर्ढेकर, शरश्चंद्र मुक्तिबोध, विंदा करंदीकर इत्यादि कवींच्या काव्यांतून व्यक्त झालेला आहे.

यंत्रयुगामुळें आणखी एक महत्वाचा परिणाम समाजावर झाला. सामाजिक विषमता आणि सत्तासमूह यांची अधिक भर पडली; आणि तिचें दर्शन घडविण्याचा प्रयत्न या कवींनीं केला. असें करीत असतांना त्यांना एक जाणवलें कीं कोणताहि नवा अवतार झाला तरी मानवी जीवन हें ठराविक चाकोरीनेंच जात आहे. ' सटीक मानवतेची टिपणी । पुन्हा वाचली अर्थ तोच तरी' असें मर्ढेकर कां म्हणतात तें समजूं लागते; आणि विंदा करंदीकर जेव्हां कंठरव करतात—

तेंच तें-तेंच तें
माकडछाप दंतमंजन
तोच चहा तेच रंजन
तींच गाणीं तेंच तराणे
तेच मूर्ख तेच शहाणे
सकाळपासून रात्रीपर्यंत
तेंच तें-तेंच तें—

तेव्हां त्यांच्या शब्दांना आलेली धारहि कळूं लागते. वसंत बापट, मंगेश पाडगांवकर, वि. म. कुळकर्णी हे इतर कवि घेतले तरी त्यांच्या











किती साम्य आहे नाहीं तुझ्या नि याच्या तोंडांत !

कांहीं कवितांतून समाजजीवनाचें वास्तव चित्रण दिसून येतें. हें वास्तव चित्रण करीत असतांना कवीच्या शब्दांना उपरोधाची जोड मिळतें. 'गणपत वाण्याचें' शब्दचित्र मर्ढेकरांनीं काढलेलें असलें तरी शेवटल्या दोन ओळींतील–'एक मागतां डोळे दोन। देव देतसे जन्मांधाला।'–उपरोध स्पष्टपणें जाणवूं लागतो; किंवा 'जग पुढें गेलें' हें सांगत असतांना मंगेश पाडगांवकर म्हणतात, 'आतां ओठा-ओठावर एकच मंत्र जपा। लारिलपा लारिलपा—'तेव्हां आजच्या तथाकथित संस्कृतीचें उपरोधिक दर्शन त्यांना घडवावयाचें असतें.

प्रत्येक कविच्या काव्याचा सविस्तर आढावा घेणें एकाच लेखांत अशक्य आहे. परंतु वरील विवेचनांतून एकच गोष्ट स्पष्ट करावयाची आहे ती ही कीं–युद्धोत्तर कालांतील कवि हे जितके अंतर्मुख तितकेच बहिर्मुख झालेले आहेत; अशा प्रकारच्या कवितांत एकप्रकारची चिंतनपरता दिसून येते; सामाजिक जाणीवेविषयींची चिंतनपरता आणि उपरोध हा युद्धपूर्व कालांतील काव्यापेक्षां वेगळ्याच तीव्रतेचा आणि धारेचा होता; तेवढें त्याचें नाविन्य जाणवतें.

येथें आणखी एक मुद्दा स्पष्ट करावयाचा आहे; 'आजचें वास्तव चित्रण' ही युद्धोत्तर कालांतील प्रमुख काव्यप्रवृत्ति म्हणून सांगितलें. त्या प्रवृत्तीचें स्वरूप दोन प्रकारचें आहे, तें असें:–मर्ढेकरांनीं फक्त त्यांना जाणवलेल्या वास्तवाचें चित्रण केलें, परंतु विंदा करंदीकर, शरश्चंद्र मुक्तिबोध इत्यादि कवींनीं वास्तव चित्रणाची जोड समाजवादी विचारसरणीला दिली. त्या विचारसरणींतून एक प्रकारचा आशावाद जन्माला आला आहे. आजच्या वास्तवांतूनच उद्याचें वास्तव जन्माला येणार आहे. 'आजच्या अगतिक' मानवी जीवनांतील रक्ताच्या लाल सड्यांतच—' (मुक्तिबोध) उद्यांच्या भवितव्याचें रुपडें जन्म घेत आहे. असा आशावाद या कवींजवळ आहे; आणि आजच्या जीवनांतलें वैफल्य व्यक्त करीत असतांनाच हा आशावादहि त्यांनीं व्यक्त केला आहे. यंत्रयुगाची अगतिकता विंदा करंदीकरांना जाणवलेली असली तरी त्यांना यंत्रावताराचा स्वीकार करावासा वाटतो. यंत्राचा अवतार शांतीसाठीं नसून क्रांतीसाठींच आहे अशी श्रद्धा कवीजवळ असल्यामुळें कवि 'ॐ क्रांतिः क्रांतिः क्रांति' असा यंत्रावताराचा उद्घोष करतो 'मानवाच्या मुक्तिसाठीं अजून एक समर आहे' या श्रद्धेपोटींच जनतेच्या अमरत्वाची जाणीव त्यांना झालेली दिसते. ('ही जनता अमर आहे') उद्याच्या वास्तवाचे, आशावादी भवितव्याचे विचार अनेक कवितांतून शरश्चंद्र मुक्तिबोध यांनीं व्यक्त केले आहेत. ('नवी मळवाट' हा काव्यसंग्रह) आतां त्याचा परिणाम असा झाला कीं या आशावादी समाजवादी विचारसरणीला उघड उघड लालक्रांतीचा वास येऊं लागला आहे. मुक्तिबोधांच्या 'यांत्रिक' या नव्या काव्यसंग्रहांतील कांहीं स्थळें पहा—

आम्ही भोळे चीनचे शेतकरी
घामामध्यें भिजवून
भाकर ती खातांना
पाठीवर होता पाऊस
बुटांचा !

आणि चिनी शेतकऱ्यांची ही अनुभूति कशासाठीं? तर पुढें हा शेतकरी भारतीयांना आव्हान देतो—

हुश्शार रे ! आशियाचे क्रांतिकारी लोक हो
पूर्वेला उभा सूर्य तुम्हा हांका मारतो
दिसेना तो ज्यांना त्यांना उपटून फेका दूर
मृत्यु त्यांच्या मदतीनें तुम्हाला ठार मारतो !

कवींच्या आशावादाचें स्वरुप हें असें आहे. तें अतिरिक्त असेल. पण त्या विशिष्ट विचारसरणींतून तो निर्माण झाला आहे आणि त्यांचें दर्शन युद्धोत्तर कालांतील काव्यांत घडतें.

युद्धोत्तरकालांत काव्यनिर्मितीवर मानसशास्त्राच्या विचारसरणीचा मोठा परिणाम झाला; मनाविषयींची कल्पना मानसशास्त्रानें बदलून टाकली; पूर्वीं मन हें एक स्वतंत्र अस्तित्व ( Entity )मानलें जात होते. विचार, जाणीव आणि इच्छा हीं तीन कार्यें मनाचीं होती. मन ही जाणीवेची पातळी मानली जात असे. परंतु मानसशास्त्रानें आतां असें सिद्ध केलें आहे कीं मन हें अनेक थरांचें बनलेलें आहे. आणि सर्वांत वरचा थर म्हणजे ही जाणिवेची पातळी. विचार, जाणीव आणि इच्छा हीं कार्यें पूर्वीप्रमाणेंच या पातळीवर चालतात; परंतु नव्या विचारसरणींत या वरच्या पातळीला गौण स्थान उरलें आहे.

मानसशास्त्राच्या परिणामांतीं काव्यनिर्मितीचें किंवा वेगळ्या शब्दांत आवाहनाचें–जागृतीचे तंत्र बदललें. नेणीवेपासून जाणीवेपर्यंत मनाचे अनेक थर आहेत.. या सर्व थरांचे व्यापार एकाचवेळीं चालू असतात. मोटारींच्या वाहतींतलें उदाहरण पहा. One–way–traffic असतो तेव्हां काय होतें ? जाणाऱ्या मोटारी जातात तेव्हां येणाऱ्या मोटारी त्यांच्यासाठीं वाट मोकळी करून देतात; येणाऱ्या मोटारी येतात तेव्हां जाणाऱ्या मोटारी त्यांना वाट देतात. हा रहदारीचा व्यापार सुगम होतो. जेव्हां Two ways traffic असतो तेव्हां मोटारींचे येणेंजाणें एकाच वेळीं चालू असतें; नेणीव आणि जाणीव यांचा व्यापार Two–ways–traffic सारखा असतो. या व्यापारांतूनच भावजागृतीचें किंवा भावावाहनाचें तत्त्व निर्माण झालें तें असें; एक वस्तु दुसरी वस्तु सूचित करतें दुसरींतून तिसरी वस्तु सूचित होते; आणि त्यांतून एक मालिकाच तयार होते; कित्येकदां असें होतें कीं या वस्तूंचें परस्पर नातें किंवा संबंध कांहींहि नसतो. फक्त त्या वस्तूंची जुळणी ( Link ) असते. ही जुळणी कित्येकदां इतकी सूक्ष्म असते कीं सुबुद्ध मनाला जाणवणेंच अशक्य असतें. या संपूर्ण प्रक्रियेला मुक्त साहचर्य ( Free Associations ) असें म्हणतात; मुक्त साहचर्यामुळें ध्वनिव्यापार चालतो; नव्या विचारसरणींतून निर्माण होणाऱ्या काव्याला या ध्वनिव्यापारामुळेंच किंवा त्याच्या साह्यानेंच काव्यांतील परिणामकारकता साधावयाची आहे.

अनुक्रमणिका



या मुक्त सहचार्यांना काव्यांत स्थान दिल्यामुळें काय परिणाम होतो याविषयींचें प्रख्यात टीकाकार Day Lewis यांचे उद्गार मी या ठिकाणीं देतो. तो म्हणतो—' The Process makes the things difficult for the reader, because his abolition with any given idea or image are probably different from those of the poet and he is likly to feel puzzled and uncomfortable as if he were listening to some one talking in Sleep—'कविमनांतील मुक्तसाहचर्य आणि वाचकमनांतील मुक्त साहचर्य यांच्यांत भिन्नत्व असण्याची शक्यता असते; आणि मग काव्य वाचत असतांना आपण 'झोपेंतली बडबड तर ऐकत नाहीं ना ?' असें वाटतें. नवकाव्यांतील दुर्बोधता व संदिग्धता यावर मुक्तसाहचर्यांच्या व्यापाराचा प्रकाश पडूं शकतो.

मर्ढेकरांची एक कविता पहा—

**अभ्रांच्या ये कुंद अफूनें**
**पानांत ह्या हिरवी गुंगी**
**वैशाखांतील फांदीवरती**
**आषाढाची गाजर-पुंगी**
**मिटून बसली पंख पांखरें**
**पर्युत्सुक नच पीसहि फुलतें**
**मूक गरोदर गाईची अन्**
**गळ्यांतली पण घंटा झुरते**
**तिंबुन झाली कणीक काळी**
**मऊ, मोकळी ह्या रस्त्याची**
**उष्ट्या अन्नामध्यें थबकली**
**चोंच कोरडी बघ घारीची**

या संपूर्ण कवितेंत मर्ढेकरांना वैशाखांतील वातावरणाच्या एक अनुभव व्यक्त करावयाचा आहे. तो अनुभव व्यक्त करीत असतांना त्यांनीं अलंकरणाची मदत घेतलेली नाहीं (उपमा, उत्प्रेक्षा, , रूपक इ. अलंकार) अनुभव व्यक्त होत असतांना मनाच्या वेगवेगळ्या थरांवरील Free anociations अभावितपणें अनुभवाबरोबर व्यक्त झाली आहेत; ' पांखरें ' ' गरोदर गाय ' ' कणीक ' ' रस्ता ' ' उष्टें अन्न ' ' घार ' ' ब्रेक ' ' आगगाडी ' ' धरणी ' ' पाऊस-पातें ' 'मृगजल ', मुक्तसाहचर्यांचे हे वेगवेगळे अस्तित्व विषय ( entity ) आहेत. त्या साहचर्यांची जुळणी ( Link ) आहे. परंतु त्या जुळणींत तार्किक सुसंगति ( Logical Sequence ) नाहीं त्यामुळें मुक्तसाचर्यांच्या या मालिकेंतून सलग अनुभव शोधून काढावा लागतो. मुक्तसाहचर्यांत तार्किक संगति नसली तरी भावसंगति ( emotional seqncuce ) असते. त्या भावसंगतीचा शोध घ्यावा लागतो. तो शोध लागणें हें अतिप्रयासाचें काम आहे; त्याचा परिणाम काव्यातील दुर्बोधतेकडेच होतो.

मुक्त साहचर्याचें भावानुभासमवेत दर्शन घडविण्याची प्रवृत्ति आजच्या काव्यांत दिसून येते. मर्ढेकरांच्या कविता सदानंद रेगे, पु. शि. रेगे, मुक्तिबोध, दिलीप चित्रे इत्यादि कवींच्या कविता या मुक्तसाहचर्यांच्या कवितांमुळेंच दुर्बोध झाल्या आहेत. मुक्त साहचर्यांतून व्यक्त होणाऱ्या कवीच्या भाववृत्ति, भावस्मृति किंवा भावविचार आणि वाचकाच्या मनांतील वृत्ति, स्मृति व विचार सामान्य साम्यस्वरूप ( General identity ) असेल तर त्यांचें काव्य म्हणजे ' झोपेंतल्या बडबडीचा आस ' वाटणार नाहीं.

या प्रवृत्तींतूनच प्रतिमावाद निर्माण झाला. मुक्त साहचर्य आणि भावानुभव यांची अभिव्यक्ति होत असतांना आवश्यक असणारा अन्वयार्थ, तार्किक संगति, आशय विस्तार इत्यादि गोष्टी कवि हा जाणूनबुजून टाळीत असतो. मग त्याला काय करावयाचें असतें ? अनुभव आणि साहचर्य यांच्या प्रतिमा त्याला व्यक्त करावयाच्या असतात. कारण प्रतिमांच्या द्वारें त्याला अनुभूतींचें संवाहन करावयाचें असतें ?

नव्या विचारसरणींत काव्यकला ही देखील रंगकलेप्रमाणेंच Art in space झाली आहे. अनुभवाच्या आणि मनाच्या विविध थरांवरील मुक्तसाहचार्यांच्या प्रतिमांचा संयोग फक्त त्याला करावयाचा असतो. त्यांत कालसंगतीला स्थानच नाहीं. किंबहुना मुक्तसाहचर्यांत कालसंगती असतेच असें नाहीं. बहुधा ती नसतेंच; त्यामुळें व्यक्त होणाऱ्या प्रतिमांतहि कालसंगती नसते; चित्रकारांच्या कॅन्व्हॉसवर जशा रंगप्रतिमा असतात, तशा काव्यांत नुसत्याच प्रतिमा असतात. त्या प्रतिमांना Chance images म्हणतात. अनुभव व्यक्त होत असतांनाच या प्रतिमा तयार होतात; किंवा मुक्तसहचर्यांच्या रूपांत अनुभवाच्या प्रतिमा सर्जनशील मनांत तयार असतातच. निर्मितीच्या वेळीं त्या भराभर शब्दरूप होतात; चित्रकाराच्या रंगरेखेप्रमाणें, अर्थात या Chance images मुळें काव्य दुर्बोध होतें. चेहेऱ्यावरचा आविष्कार किंवा शब्द ज्याप्रमाणें राग, हुरहुर किंवा आनंद व्यक्त करतात तसें व्यक्तिकरण ( Expression ) त्यातून होत नसलें तरी कलावंताच्या भावानुभवांची गर्भधारणा त्या रंगांत झालेली असते. Tintoretto नांवाच्या एका चित्रकारानें चित्रांत आकाशांतील पिवळी मेघ किंवा रेघ (yellow reft ) दाखविली. त्यांतून त्याला विशिष्ट प्रकारची मनोवेदना ( angujsh ) सुचवावयाची होती. आतां ती पिवळी रेघ म्हणजे एकाचवेळीं मनोवेदनाहि झाड आणि आकाशरेखाहि आहे. याचा अर्थ असा कीं मनोवेदना साकार झाली आहे, आणि तिचें आकाशरेखेंत रूपांतर झालें आहे. म्हणजेच तिचें वस्तूंत रूपांतर झालें आहे.

नवकाव्यांतील प्रतिमांचा व्यापार नेमका तसा आहे. त्याच्या निर्मितीचा व्यापार आशयनिष्ठ असतो. म्हणून आशयघन प्रतिमा तो व्यक्त करीत असतो. वाचकांनीं त्या प्रतिमा समजून घ्यायच्या असतात.

आतांपर्यंतच्या विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट झाली आहे. आज नव्या विचारसरणीच्या काव्यांत प्रतिमेला अतिशय महत्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. किंबहुना प्रतिमा हें काव्याचें व्यवच्छेदक लक्षणच झालें आहे. काव्याची व्याख्याच आज अशी केली जाते ' Poetry Is an Imege whice presents an emotional or Intelletual complex in an instant of time. म्हणजे कालाच्या एका क्षणांत भावगंडाचें किंवा बुद्धिगंडाचें दर्शन घडविणारी प्रतिमा म्हणजे काव्य; मग ती एकच प्रतिमा असेल किंवा प्रतिमांची जुळणी ( link ) असेल; साखळी ( cnain ) असेल; सदानंद रेगे यांचें चार ओळींचे किल्येकदां चार शब्दांचें किंचित् काव्य वाचकांनीं लक्षांत घ्यावें. त्याला काव्य कां म्हणावयाचें ? तर त्यांत एक सघन प्रतिमा असते- आणि ती प्रतिमा म्हणजे एक अनुभव असतो. वरील उदाहरणांत पिवळी रेघ ही वस्तुनिर्मिति आहे. आणि मनोवेनाहि आहे. त्याचप्रमाणें प्रतिमा ही एकाच वेळीं अनुभव असते आणि त्याचवेळीं कलाकृतीहि असते, नवकाव्याच्या विचारसरणींत कलाकृति-अनुभव

अनुक्रमणिका




आणि प्रतिमा यांच्यांत अभिन्नत्व मानलें जातें. त्यामुळें काव्यांत फक्त प्रतिमा तेवढी वाचकांना दिसते. अर्थात त्यामुळें काव्य दुर्बोध होतें.

नंतर प्रतिमावादानें त्रुटित काव्य स्वीकारलें. नवकविता ही आकारानें लहान असते. प्रतिमावादाचीं दोन तत्वें स्थूलमानानें सांगतां येतील. पहिलें तत्त्व म्हणजे ' shorter the better ' अलंकार संप्रदायानें आविष्काराची वेगळी पद्धत स्वीकारली होती. काव्यविषय आणि काव्यविषयाचा विस्तार करणाऱ्या कल्पना त्यांत असत. गडकरी, तांबे, यशवंत, गिरीश इत्यादि पूर्वसुरींच्या कविता त्या दृष्टीनें पहाव्या; परंतु प्रतिमावादानें पहिली महत्वाची गोष्ट कोणती केली असेल तर ती ही कीं काव्य विषयाच्या विस्ताराची कल्पना सोडून दिली. ' shorter the better या तत्वानुसार सघन प्रतिमांचा व्यापार सुरूं केला. ढगांचा गडगडाट झाला कीं त्याचा आवाज कानांवर येतो आणि त्याचवेळीं त्याचं परावर्तन अनंतापर्यंत विस्तारत जातें. तसा परिणाम सघन प्रतिमांचा वाचक मनावर होतो; किंवा व्हावयास पाहिजे असें नवकवींना अभिप्रेत असतें. प्रतिमावादाचें दुसरें तत्त्व यांतूनच निर्माण होतें. Minimum of means for ' maximum effects ' जास्तींत जास्त परिणामासाठीं कमीत कमी साधनांचा वापर. त्यामुळें नुसत्या सघन प्रतिमा 'पाडण्या'कडेच कवीची प्रवृत्ति वळली आहे. त्यांत कवीचें स्वतःचें समाधान होतें. कवि स्वतःवर खुश होतो. परंतु वाचकांना त्यांत कोणतेंच समाधान मिळत नाहीं. प्रतिमावादाच्या या तत्त्वांचा वाचकावर काय परिणाम होतो याचें मार्मिक वर्णन Martin Gilkes यानें केलें आहे. तो म्हणतो, ' वाचकाला वाटतें–It is like eating an orange from which all the juice has been squeezed ' अलीकडचे कांहीं कवि आरती प्रभु, तुकाराम काजे, राम शेवाळकर, मधुकर केचे यांच्या काव्यांतील प्रतिमाव्यापार पाहिला म्हणजे हा प्रत्यय येईल. आरती प्रभु यांच्या दोनच ओळी पहा–

**तीक्ष्ण दिठीचें गरळ ठिबकतें थेंबा थेंबा कंपी पंखीं**
**मिठींतलें जड खुडितां खुडितां रुतलों पुरता पंकीं**

सघन प्रतिमा–व्यापाराबरोबरच आणखी एक प्रवृत्ति निर्माण झालेली दिसते. तिचाहि जातां जातां उल्लेख केला पाहिजे; ती प्रवृत्ति म्हणजे शब्दसंयोगाची. निरनिराळे शब्द एकत्र आणले जातात. जे शब्द व्यवहारांत कधीहि एकत्र आणले जाणार नाहींत. कवि व्यवहारांतील शब्दांना आपल्या मनाप्रमाणें राबवतो. 'पाऊस–पातें,' 'अशाश्वताची ढाल', 'शाश्वताची समशेर,' 'मिठींतले जड,' 'गर्द हवा', 'जर्द हवा,' 'मदिर क्षण,' 'क्षितिज ओढणी,' 'आर्त फूल,' 'पुळणीचे ओठ' अशा प्रकारचे शब्दसंयोग आजच्या कवितेंत आढळतात; लोकविलक्षण संयोग; त्याच्यामागे विशिष्ट विचारसरणी आहे. प्रत्येक शब्दांत एक प्रतिमा असते. त्याला शब्दप्रतिमा (word image) म्हणतात; शब्द प्रतिमेभोंवतीं साहचर्याचीं वलयें (Auras of associations) असतात. एका शब्दापुढें दुसरा शब्द ठेवला कीं परस्पर वलयांचा एकमेकांवर परिणाम होतो. आणि निराळेंच वलय निर्माण होतें. जसे दोन रंगाच्या शेड्समधून तिसरीच शेड् निर्माण होते; प्रत्येक शब्द म्हणजे एक सूक्ष्म जगत् असते. आणि असे अनेक शब्द एकत्र आले कीं त्यांतून संपूर्ण प्रतिमा तयार होते; शब्दप्रतिमा (Word Image) साहचर्याचें वलय (Aura of association) आणि काव्य प्रतिमा (Poetic Image) अशा तीन अवस्था महत्वाच्या आहेत;

पान ३७ वर...

# वारसा



हवेंतला गारवा चांगलाच जाणवूं लागला होता. अंगांत कोट चढवितां चढवितां मार्गारेट ड्रेसिंग टेबलासमोर आली. केंसावर ब्रश फिरविण्यासाठीं ती खाली वांकली; त्याचवेळीं समोरच्या गच्चीवर बसलेल्या एलिझाबेथची प्रतिमा तिला आरशांत दिसली. केंस विंचरणं सोडून ती तिच्याकडे बघतच राहिली. किती सुंदर दिसत होती अजूनहि ती! पन्नाशीच्या जवळपास असूनहि तिचं सौंदर्य अजूनहि लोपलं नव्हतं. ती तशीच होती. नाजुक, बाहुलीसारखी. त्या शेजारीच पडलेली आपली छबी बघूनें ती नाराज झाली. वयाचा शिक्का तिच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें उमटला होता. किंचित् स्थूलपणाकडे झुकणारं तिचं शरीर आणि मध्येंच डोकावणारे पांढरे केस तर तिचं प्रौढत्व अधिकच स्पष्ट करीत होते. ती तशीच दोघांची तुलना करीत राहिली असती पण तेवढ्यांत लिझीनें आपली नजर चाळवली आणि ती वर आपल्याकडे बघेल या भीतीनें ती बाजूला झाली. दार उघडून समोरच्याच गच्चीवर आली. विणकामांतून वर बघून लिझीनें नुसतें एक स्मित केलें. हेंच तें स्मित! सगळ्या पुरुषांना वेड लावणारं! असूयेची भावना लपविण्यासाठीं मार्गारेट तिच्याकडे पाठ करून गच्चीच्या बाजूच्या कठड्याला टेकून उभी राहिली.

समोर लांबपर्यंत दाट हिरवळ पसरली होती. त्यावर मध्येंमध्यें माणसं विखुरली होती. डावीकडच्या बागेंतून लहान मुलांचें खिदळणें आणि मधूनच एखाद्या बाईचें तारस्वरांतलें बोलणें ऐकूं येत होतें. तरणीताठीं माणसं फिरण्यासाठीं उजवीकडे वळत होती, झाडींत अदृश्य होत होती, त्या साऱ्या दृश्याकडे नजर लावून ती थोडा वेळ तशीच उभी राहिली.

तेवढ्यात मागच्या जिन्यावर चोरटीं पावलें वाजली. तिच्याजवळच थांबली, मग कुणीतरी दबक्या स्वरांत म्हणालं, 'आतां नको बाई! आई ओरडेल' हा तिच्या मुलीचा आवाज होता!

— सौ. सुनीता जोशी

मनमोकळ्या स्वरांत दुसरं कुणीतरी बोललं, 'घाबरतेस काय ग एवढी? यावेळीं फिरण्याची मजा त्या म्हाताऱ्यांना काय कळणार आहे? आणि रागावतील तरी आल्यावर ना? हुं! गुपचूप उभं राहून ऐकून घ्यायचं आणि उद्योगाला लागायचं!' अरेच्या! हे रीटाचं लिझीच्या मुलीचं शहाणपण तर!

दुसऱ्याच क्षणीं जिन्यावरून पावलं सरसर वाजली. बाजुच्या झाडीच्या दिशेनें धांवणाऱ्या त्या दोघींच्या आकृति तिला दिसल्या. तिची मुलगी रीटाच्या पाठोपाठ होती. वाटेंत थांबणारे तरुण वरचेवर थांबून त्यांच्याशी-खरं म्हणजे रीटाशीं बोलत होते आणि आपल्या भुरभुरत्या बटा सांवरीत ती पण त्यांना उत्तरें देत होती. तिच्या मुलीचा हात धरून पुढें जात होती. हें पाहतांना असूयेची एक चमक परत तिच्या मनांत उठली. तिची मुलगी वास्तविक कितीतरी सुंदर होती पण अतिशय लाजरी आणि संकोची वृत्तीची ही मुलगी बाजूला पडत होती आणि रीटा! तिच्या आईसारखीच सर्वांना मोहवीत होती, जिंकून

*त्यावेळचं सारं चित्र तिच्या डोळ्यासमोर उभं राहिलं. तिला भेटण्यासाठींच तो आला होता. जीव टाकून ती त्याच्यावर प्रेम करीत होती. पण.....*

घेत होती. त्या दोघी दृष्टीच्या टप्प्याआड जाईपर्यंत ती बघत राहिली. सशासारख्या त्या दोघी झाडींत अदृश्य झाल्या. ती मागे वळली. लिझी अजूनहि विणण्यांत गर्क होती, तेंच स्मित चेहऱ्यावर ठेवून! एकाएकी तिच्याबद्दलचा द्वेष मॉगीच्या मनांत उफाळलां. दिल दुखवावं, अगदी जिव्हारी घाव बसेल असं बोलावं असं तिला वाटलं. अंगाभोवती कोट लपेटून घेत ती म्हणाली, ' किती थंड हवा आहे नाही ! '

लिझीचं स्मित थोडं रुंदावलं.

' बाकी आपल्या वयामुळें ही थंडी आपल्याला जाणवत असणार. नाहींतर यापेक्षां दहापट थंडी असली तरी आपण उनाडक्या करीत बाहेर हिंडायचो ! आठवतं ?'

' हो तर, ' वर बघून लिझी म्हणाली.

' तुला आपल्या लहानपणाचं सगळं आठवतं कां ग. आपलं गांव कसं छान होतं नाहीं ! गांवाच्या चारहि बाजूला जंगलं होती आणि उंचावर बागा ! '

लिझीचे हात विणतां विणतां थांबले, वर बघत तिनें उद्गार कांढले, 'हुं !'

' फार मजा केली नाहीं आपण तेव्हां ? आणि बर्फ पडायला लागलं म्हणजे तर सगळी तरणीं माणसं फारच रंगांत यायची. अशावेळीं केवढी प्रेमप्रकरणं व्हायची नाहीं गांवांत ?'

' हो तर ' वरती बघून हंसतमुखानें लिझी म्हणाली.

' आणि तुला ती बाग आठवते कां ग ? सगळे तिला मदनबाग म्हणायचे, ' तिच्यावर दृष्टि रोखून मार्गारेट म्हणाली, ' सगळे लैला-मजनु रात्रीं तिथें भेटी घ्यायचे ! एवढ्या भयंकर थंडींत ! ! आणि दुसरें दिवशीं न्युमोनिया होऊन त्याचं सारं बिंग बाहेर पडायचं ! '

लिझीचं विणणं थांबलें, किंचित् स्वप्नाळूपणानें ती समोर बघत राहिली. पण, तिच्या चेहऱ्यावर अपेक्षित ती चलबिचल तिला दिसली नाहीं. अचानक मग ती म्हणाली, ' तूं कशाला गेली होतीस ग तिथें ?'

चमकून एलिझाबेदनें वर पाहिलें. तिच्या मोठाल्या डोळ्यांकडे बघत बरवर हंसत मार्गारेट म्हणाली, ' माहिती आहे मला तूं कुणाला भेटायला तिथें गेली होतीस ते !'

आश्चर्यानें तिच्याकडे बघणाऱ्या एलिझाबेदला ती म्हणाली,

' एडवर्डला ना ?'

लिझी तशीच बघत राहिली तशी मोठ्यानें हंसत ती म्हणाली, ' तुला नवल वाटलं ना मला कसं कळलं म्हणून ?' क्षणभर थांबून हलक्या आवाजांत ती पुढें म्हणाली, ' तिथें येण्याबद्दलची ती चिठ्ठी मींच तुला लिहिली होती. '

' तूं ?'

' हो तर ! मी स्वतः ! एडवर्ड कशाला येतो आहे तुला भेटायला ? मी आपली निव्वळ गंमत करावी म्हणून ती चिठ्ठी लिहिली. केवळ मजा म्हणून हं ! मला काय माहीत तूं वेडपटासारखी तिथें जाशील आणि न्युमोनियाचं दुखणं बरोबर आणशील म्हणून ?'

तिच्यावरची नजर काढून एलिझाबेदनें ती परत विणण्यांत गुंतविली. तिच्याजवळ सरकत छंदीपणानं मार्गारेट म्हणाली, ' बाकी तूं आजारी झाल्याचं ऐकून मला फार वाईट वाटलं हं. मीच कारण झालें ना त्याला ! पण तुझ्या आईनें मला तुला भेटूंच दिलं नाहीं.' कुत्सितपणें हंसत ती पुढें म्हणाली, ' कुणालाच तुला भेटूं द्यायला तयार नव्हती तां. काय तिला एवढी धास्ती पडली होती कुणास ठाऊक ! आणि मग आपली परत भेट झाली त्यावेळीं तूं मिसेस ब्राऊनिंग झाली होतीस. तुझ्याजवळ दिलगिरी प्रदर्शित करायला मला वेळच मिळाला नाहीं. बाकी मला खरोखरच वाईट वाटलं हं !'

मनातल्या मनांत मात्र तिला त्यावेळीं जेवढा आनंद झाला होता, तेवढाच आतांहि झाला. त्यावेळचं सारं चित्र तिच्या डोळ्यासमोर उभं राहिलं. तिच्यासाठीं म्हणून एडवर्ड आला होता. त्यांच्या गांवी, त्यांच्या घरीं. जीव टाकून ती त्याच्यावर प्रेम करीत होती. पण एलिझाबेदला त्यानें पाहिलें आणि तिनें त्याला पुरतें मोहून टाकलें. आतां हा आपल्या हातांतून जातो कां काय अशी तिला धास्ती पडली. पण चिठ्ठी लिहिल्याच्या दुसऱ्याच दिवशी लिझी फार आजारी झाली होती. तिच्या आईनें तिला तावडतोब गांवांतून हलविली होती. आणि मार्गारेटला एडवर्ड मिळाला होता. पण त्यावेळीं रुजलेला द्वेष नंतरहि संपला नव्हता. एडवर्डला मानमरातब, कीर्ति, पैसा सारें मिळालें होतें. त्याच्याबरोबर तिनें आरामांत आयुष्य घालविलें होतें. त्याची पत्नी म्हणून ठिकठिकाणीं ती मिरवली होती. तिचं सारं आयुष्य अत्यंत वैभवांत–सुखांत गेलं होतं. पण तरीहि हें वैषम्य कायम होतें. दुर्दैवानें लिझीहि त्याच शहरांत रहात होती. कुठल्याहि सभेला, पार्टीला आपल्या सौंदर्यानें आणि गोड बोलण्यानें इतरांना आकर्षून घेत होती. तिच्यामुळें आपली उपेक्षा होते असं मार्गारेटला सतत वाटत आलं होतं. आपल्या शेजाऱ्यांत, नातेवाईकांत मित्रांत हिला फार मानाचं स्थान आहे असा तिचा ग्रह होता. इतकी वर्षं ती लिझीचा द्वेष करीत आली होती. मत्सराला सतत वाढती लागली होती. पण लिझीनं ती कधींच कांहीं बिघडवूं शकली नव्हती. गोड बोलणाऱ्या या बाईनें साऱ्यांनाच, आपलंसं केलं होतं. तीच ती सूडाची भावना मॉगीच्या मनांत उफाळून आली. ती बोलूं लागली. ' बाकी लिझी, आजहि तें चित्र डोळ्यासमोर आलं कीं मला हंसू येतं बघ. ती अंधारी रात्र, माणसंहि गोठतील अशी थंडी, गावाबाहेरचा बाग आणि एडवर्डची वाट बघत बसलेली ही चिमणी ! गोठली असशील नाहीं अगदां ?'

लिझीकडून कांहींच उत्तर आलें नाहीं. मनांतून हंसत पण वर चुरचुरत तिनें विचारलें. ' खरंच, अशी कुडकुडत किती, वेळ बसली होतीस ग तूं ? कां सारी रात्र त्याची वाट पाहण्यात घालवलीस. आतां येईल मग येईल म्हणून ? तुला तेव्हांच कसं ग कळलं नाहीं कीं तो येणार नाहीं म्हणून ? गोंधळलेल्या मुद्रेने तिच्याकडे बघत लिझी म्हणाली, ' पण...पण तो आला होता ! '

आतां धक्का बसायची पाळी मार्गारेटची होती. ' आला होता ? एडवर्ड आला होता ? पण कसा ? ती चिठ्ठी मी लिहिली होती. माझ्या स्वतःच्या हातानें. त्याची त्याला थोडीसुद्धां कल्पना नव्हती. ' वेडावल्यासारखी ती बोलत होती.

' पण...मी त्याला उत्तर पाठविलं होतं ? '

उत्तर पाठविलं होतंस ?' ते मार्गारेटच्या कधींच लक्षात आलं नव्हतं. आतां तें सारं चित्र तिच्या डोळ्यासमोर उभं राहिलं.

लिझीची वाट बघत तो तिथें उभा होता. त्या अंधारांत ती आल्यानंतर माळ्याला सांगून त्यानें एक जागा ठरविली होती आणि तिथें तिला नेलं होतं प्रेयसी म्हणून! सारी रात्र त्यांनीं बरोबर घालविली होती आणि सबंध आयुष्यांत एडवर्डनें तिला हें कधींच सांगितलें नव्हतें. लिझी भेटल्यावर एकदाहि तिच्यासमोर तो गडबडला नव्हता. तें गुपित त्या दोघांतच राहिलं होतं. त्या प्रतारणेची तिला विलक्षण चीड आली. म्हणजे एडवर्ड संपूर्ण तिचा नव्हता तर! वरवर दिसला तसा तो सरळ सालस नव्हता. तिला चोरून तो असले खेळ खेळला होता. तिच्या आधीं हिनें एडवर्डबरोबर प्रेमाचे चाळे केले होते. संतापानें मार्गारेट पेटून उठली. तारवटलेल्या डोळ्यांनीं लिझीकडे बघत राहिली. लिझी मात्र शांत होती. विणकामाचें सामान आवरतां आवरतां म्हणत होती, ' अजूनहि ती चिठ्ठी माझ्याकडे आहे !'

दुष्टपणानें हंसत मार्गारेट तिच्याजवळ गेली, म्हणाली, ' अरेरे! तुझं तेवढं समाधान मी उगीच हिरावून घेतलं. आजवर एडवर्डची पहिली आणि अखेरची चिठ्ठी म्हणून तूं ती अगदीं जपून ठेवली असशील नाहीं? तुझं तें समाधानहि मी आज हिरावून घेतलं.'

हातांतल्या सुया बाजूला सारून एलिझाबेद उठती झाली. मार्गारेट बोलतच राहिली, ' हो तर काय, तेवढा वेळच काय तो एडवर्डचा सहवास तुला मिळाला. मला माझं सारं आयुष्य त्याच्या सहवासांत घालवितां आलं, इच्छा असूनहि तुला मात्र तो मिळाला नाहीं. एका सामान्य माणसाबरोबर तुला जन्म काढावा लागला. एडवर्ड नंतर तुझ्याकडे फिरकला नाहीं.'

सुया आणि लोंकर पिशवींत टाकून लिझी उठली. दरवाजाकडे पावलं टाकूं लागली. तिच्या शांतपणाचा मार्गारेटला राग आला. संतापानें ती पेटून उठली. आवाज चढवून बोलत राहिली, ' खरंच, तुझं समाधान मी हिरावून घ्यायला नको होतं. तुझ्या आयुष्यांत प्रियकराकडून तुला तेवढी एकच गोष्ट मिळाली होती. ती चिठ्ठी! एकच!! दोन बोटांची चिठ्ठी !!!'

आत शिरतां शिरतां एलिझाबेद थबकली. मागें वळून मार्गारेटच्या नजरेला नजर देत शांतपणें म्हणाली, 'कां? मला रीटा मिळाली!'

■■■

## साहित्यिकाचीं प्रेमप्रकरणें

पान २७ वरून

प्रीतिसुमनें उधळणाऱ्या राजकवि भास्कर-राव तांब्यांनीं सुंदर सुंदर काव्यरचना केली आहे. त्यांनी लिहिलेली सारीं प्रेमगीतें त्यांना त्यांच्या पत्नीवरील अलोट प्रेमामुळेंच लिहितां आलीं. ता. २३ ऑगस्ट १९२० रोजीं प्रताप-गडाहून लिहिलेल्या एका पत्रांत राजकवि लिहितात, ' माझीं सारी प्रेमगीतें मला माझ्या पत्नीवरील अलोट प्रेमामुळेंच लिहितां आलीं. मी जर प्रीतीचा भरपूर आस्वाद घेतला नसता तर तिच्या अभावी प्रीतीची एक ओळहि मला खरडतां आली नसती ' वारुबाईच्या गाढ प्रीतींतच भास्कररावांच्या काव्यरूपी ' ताना जनन पावल्या, व तिच्या 'लोचन कासारी'च त्यांची ' कवन–कमळें ' फुलली. मनाजोगती प्रेयसी, धर्मपत्नी, सहचारिणी लाभलेले तांबे हे एकुलते एक कवि होत. ' स्पर्शें सखीच्या अमर जाहलों ' किंवा ' एका सखीच्या हृदयीं-पूर्णता मज लाभे संसारी ' हे त्यांचे काव्यांतील अर्थपूर्ण उद्गार त्यांचें जीवित प्रेम फळास आल्याचें द्योतक होय.

ज्ञानकोश म्हणजे ज्यांत सर्व विषयांवरचें ज्ञान भरलेले असतें असें पुस्तक. असें पुस्तक तयार करणें म्हणजे केवढा चिकाटीचा खटा-टोप आहे. आपल्या भारतांत ज्या निरनिराळ्या भाषा बोलल्या जातात त्यापैकीं एकट्या मराठींतच अशा प्रकारची ग्रंथरचना झालेली आहे. हा महान उद्योग करणारे डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचेविषयीं कुणाला आदर वाटणार नाहीं!

डॉक्टरसाहेब इंग्लंडमध्यें असतांनाची गोष्ट. ते तिथें मे १९११ पासून सप्टेंबर १९१२ पर्यंत होते. इंग्लंडमधें रिजंट स्ट्रीटवरील ' नोबडीज क्लब ' नांवाच्या एका संस्थेचे डॉक्टर हे संयुक्त चिटणीसापैकी एक चिटणीस होते. मि. कोहन व त्यांच्या दोन मुली त्या संस्थेच्या सदस्य होत्या अन् तेथेंच मिस एडिथ व्ही. कोहन यांजबरोबर डॉक्टरांची ओळख झाली. या दोघांच्या मैत्रीला लौकरच खूप खोल प्रेमादराचें, कळवळीचें स्वरूप आलें. १९१२ सप्टेंबरांत डॉ. जेव्हां स्वदेशी आले तेव्हांपासून तो सुमारें सव्वासात वर्षें दर आठवड्यास पत्र पाठवून उभयतांनीं स्नेह टिकविला. त्यांत परस्पर प्रेमादराचा खोल संस्कार निश्चित निर्माण झालेला होता. ' बाळे कोहिनूर ' हें डॉ. केतकरांनीं लिहिलेलें एक प्रेमकाव्य आहे. कोहिनूर हें कवीनें आपल्या प्रियेस दिलेलें नांव आहे. कवीला आपल्या प्रियेच्या प्रेमाची खात्री पटलेली असून प्रेमाकुल झालेल्या व्यक्ति अनुकंपेला पात्र असतात हेंहि त्याला पूर्णपणें माहीत आहे. कवि भारतीय व प्रिया युरोपीय असल्यानें सत्प्रेमाचें अंतिम इष्ट फल जें विवाह तेंहि उभयतांना दुष्प्राप्य आहे असें कवि म्हणतो.

पुढें १९१९ च्या डिसेंबरात ज्ञानकोशाच्या कार्याकरितां कु. एडिथ कोहन भारतांत आल्या. येथें भावनेपेक्षां विवेकानेच प्रत्येक गोष्ट करण्याची उभयतांनीं जाणीव ठेवली. कु. कोहननी लो. टिळकांचा सल्ला घेतला आणि अखेरीस दोघेहि तिशी उलटलेली हीं सुविचारी माणसें केवळ परस्परांच्या प्रेमादरानें बद्ध म्हणून विवाहास सिद्ध झाली व महाराष्ट्रां-तील अविस्मरणीय प्रेमविवाह ता. १४ मे १९२० रोजी पार पाडला. या विवाहप्रसंगीं सेनापति बापटांनीं पुरोहिताचे काम केलें होतें हें विशेष होय.

सुशिक्षित स्त्रियांनीं पुरुषांबरोबर मनमोकळे-पणानें बोलावें, चालावें, लैंगिक मानसशास्त्रा-सारख्या विषयांतहि निर्भीड विचार प्रदर्शित करावेत, थट्टामस्करी करावी यासारखी डॉ. केतकराचीं मतें त्यांनीं लग्नापूर्वीच लिहिलेल्या ' गोंडवनांतील प्रियंवदा ' या कादंबरींतून आढळतात. आपली पत्नीसुद्धां 'प्रियंवदे'सारखी असावी असें कुणाहि सुशिक्षित सुधारकास ती कादंबरी वाचून वाटेल. पित्यानें आपल्या मुलां-मुलींना विवाहपूर्ण प्रेमाराधन करूं द्यावें यासारखे विचार त्यांनीं 'विचक्षणें'त डॉ. लोंढेद्वारा प्रद-र्शित केले आहेत. ' विचक्षणें'तील डॉ. लोंढे व 'आशावादी'तील देवीदासपंत अत्रे ऊर्फ ब्रह्मगिरीबुवा ही बऱ्याच अंशी डॉक्टरांची स्वतःचीं अशी चित्रें आहेत.

सारांश, या दुनियेंतील प्रेम ही एक विल-क्षण चीज आहे. अद्भुत शक्ति आहे. रसिक नारीप्रेमानें मोहून जातो, आकर्षित होतो, वेडावून जातो अन् त्या वेडांतूनच कित्येकदां सुंदर सुंदर साहित्यकुसुमें फुलतात व त्यांचा परिमल अनंत कालपर्यंत या भूतलावर दरवळत राहातो.

■■■





**नवकाव्याचें अंतरंग**-पान ३३ वरून...

किंबहुना निर्मितीचें तें रहस्य आहे. उदा. म्हणून मर्ढेकरांच्या कवितेंतील एक ओळ पहा: 'अन् डोळ्यांमधिं घेऊनि चांद'—'अन्' हा शब्द पूर्वीची कांहीं घटना आणि आतां पुढें होणारी जोडली जाणार असल्याचें सूचित करतो; 'डोळा' या शब्दाभोंवतीं अनेक वलयें आहेत—विशिष्ट-प्रकारची दृष्टि, मनांतील अनंत भावना सांठवून ठेवण्याचें सामर्थ्य वगैरे. 'चांद' ह्या शब्दांभोंवतीं प्रकाशाचीं, आशावादाचीं, खिन्नतेची अनेक वलयें आहेत. परंतु हे शब्द एकत्र येतात तेव्हां त्यांतून 'तिच्या डोळ्यांत अश्रु आले' हा अर्थ स्पष्ट होतो. हे अश्रु अगतिकतेचे आहेत अन् कांहींतरी अपेक्षा करणारे आहेत हेंहि सूचित होतें.

प्रतिमावाद हा स्वतंत्र विचाराचा विषय आहे. त्यांतलें तत्त्व चांगलें असलें तरी त्यांतून अनिष्ट प्रवृत्ति निर्माण झाल्या आहेत. आरती प्रभु, तुकाराम काजे, राजा राजवाडे, मधुकर केचे इत्यादि अलीकडच्या कवींची पिढी या प्रवृत्तींना बळी पडत आहे. विंदा करंदीकर, मर्ढेकर, पु. शि. रेगे या कवींनीं आशय आणि अभिव्यक्ति यांचे प्रयोग केले; ही नवी पिढी नुसतेंच अंधानुकरण करीत आहे. वाचकांनीं काव्य समजून घेण्याच्या दृष्टीनें नव्या विचारसरणीचा अभ्यास करणें जितकें आवश्यक तितकेंच नव्या पिढींतील कवींनीं देखील कला-निर्मितीचें रहस्य प्रथम नीट अभ्यासिलें पाहिजे. नाहींतर मराठी काव्याचें भवितव्य धोक्यांत आहे.

जातां जातां आणखी एक प्रवृत्तीचा उल्लेख करावयाचा आहे. अर्थात् ही प्रवृत्ति स्वागतार्ह आहे; या प्रवृत्तीनें नव्या विचारसरणींतील आवश्यक तेवढें आत्मसात केलें आहे. सौंदर्यवादी किंवा स्वच्छंदवादी काव्य होऊन गेलें आहे: आत्यंतिक व्यक्तिवाद, आत्मनिष्ठा, स्वयं-केंद्रितता; आपल्या मनांतील भावनांना आविष्कार करण्याची तीव्र लालसा, पराकाष्ठेची भावनोत्कटता, वस्तुस्थितीशीं मिळतें न घेतां, प्राप्त गोष्टींत समाधान न मानतां, अप्राप्य सुदुर्लभ गोष्टींची अभिलाषा बाळगणें म्हणजेच एक प्रकारची अतींद्रियता. निसर्गाच्या विविध सौंदर्याशीं होणारे संवादित्व, अज्ञेयवाद, गूढवाद, अतिमानुष (Supernatural) अद्भुत घटना, स्वप्नरंजन इत्यादि सौंदर्य किंवा स्वच्छंदवादाचीं अनेक वैशिष्ट्यें सांगतां येतील. मंगेश पाडगांवकर, वसंत बापट, इंदिरा संत, सदानन्द रेगे (कांहीं अंशीं) यांची कविता वेगळ्या प्रवृत्तीची आहे; मर्ढेकर, विंदा करंदीकर आणि पु. शि. रेगे यांनीं जशी वेगळ्या प्रवृत्तीची कविता निर्माण केली तशी या कवींनीं निर्माण केली नाहीं; माझ्यामतें या कवींचें श्रेय वेगळेंच आहे; स्वच्छंदवादाचें पुनरुज्जीवन म्हणून मानावयाचें तर कवीची कविताच विचारांत घ्यावी लागेल. गडकरी, बालकवि, तांबे, अनिल, कुसुमाग्रज आणि बोरकर या कवींच्या काव्यांतील सौंदर्यवादी प्रवृत्तींचेंच नवें रूप मंगेश पाडगांवकर, बापट, इंदिरा संत इत्यादींच्या नव्या काव्यांत दिसतें; नव्या विचारसरणींतील दोन प्रवृत्ति त्यांनीं उचलल्या. एक म्हणजे आशयघनता; आणि दुसरी प्रवृत्ति शब्दसंयोगाची; परंतु तरीहि त्यांचें काव्य दुर्बोध, क्लिष्ट, किंवा कृत्रिम वाटत नाहीं.

# रसिक वाचकांसाठीं एक आकर्षक योजना

'**दीपावली**' मासिकाच्या वार्षिक अंकांतील कथा, ललित लेख, कविता, रंगीत कलाकृति, व्यंगचित्रें तुमच्या वाचण्यांत व पहाण्यांत आली असतीलच. ती सर्व तुम्हाला आवडली असतील. यामागें एक योजना आहे.

'**दीपावली**'च्या वाचकवर्गाची आवडनिवड अजमावून त्या प्रकाशांत पुढील वाटचाल आंखणें हा या योजनेमागील एक उद्देश आहे. एकूण साहित्याच्या, वाङ्मयाच्या व सजावटीच्या दृष्टीनें, सामान्य वाचकांच्या आवडीनिवडीचें मोजमापही यांत मिळालें तर फायदा होणार आहे. वाचक उत्साहानें सहकार्य देतील अशी आशा आहे.

## कूपन

१ उत्कृष्ट कथा..............................

२ उत्कृष्ट ललित लेख..............................

३ उत्कृष्ट कविता..............................

४ उत्कृष्ट रंगीत कलाकृति..............................

५ उत्कृष्ट व्यंगचित्र..............................

पूर्ण नांव व पत्ता..............................

..............................

योजनेच्या अटी मला मान्य आहेत.

सही..............................

- याच पानावर विनामूल्य कूपन दिलें आहे.
- सोबतच्यां कूपनवर दीपावलीच्या वार्षिक अंकांतील तुम्हांला आवडलेली उत्कृष्ट कथा, ललित लेख, कविता, रंगीत कलाकृति व व्यंगचित्र लिहावें.
- कूपन भरून पाठविण्याची शेवटची तारीख १५ डिसेंबर १९६३ आहे. यानंतर येणाऱ्या कूपन्सचा विचार करण्यांत येणार नाहीं. संपादकाचा निर्णय अखेरचा.
- येणाऱ्या एकंदर कूपन्समधून बहुसंख्येनें निवड झालेल्या कूपनांतून जे निर्णायक कूपन ठरेल त्या कूपनाला जुळणारी कूपनें असलेल्या वाचकांना १ वर्ष 'दीपावली' मासिक भेट म्हणून पाठविण्यांत येईल.
- एका वाचकानें फक्त एकच कूपन भरून संपादक, 'दीपावली', दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई-४ या पत्त्यावर पाठवावें.
- निर्णय जानेवारी १९६४ च्या अंकांत प्रसिद्ध करण्यांत येईल.




## किर्लोस्कर ऑईल इंजिन्स लि.ची प्रगतशील वाटचाल

गेल्या महिन्यांत किर्लोस्कर ऑईल एंजिन्स प्रा. लि. या प्रगतशील कारखान्यातर्फे एका महिन्यांत १५,००० अश्वशक्तीच्या उत्पादनाचें उद्दिष्ट गांठण्यांत आलें. त्या निमित्तानें किर्लोस्कर ऑईल एंजिन्सचे अध्वर्यु श्री. शंतनुराव किर्लोस्कर यांच्यातर्फे एक भव्य सोहळाहि साजरा करण्यांत आला. श्री. शंतनुराव किर्लोस्कर यांनीं अहोरात्र झटणाऱ्या कामगारांचें मोठ्या कौतुकानें अभिनंदन केलें. ह्या प्रसंगीं बोलतांना ते म्हणाले, 'भरपूर श्रम करून चांगल्या दर्जाचा माल उत्पादन केल्यानें आपल्या कारखान्याची प्रगति झाली आहे. याच वृत्तीनें याहिपेक्षां अधिक श्रम करून प्रगतीचा उच्चांक गांठू या.

१९५७ च्या मे महिन्यांतहि असेंच किर्लोस्कर ऑईल एंजिन्स प्रा. लि. नें ५ ते ६ हजार अश्वशक्तीचें उद्दिष्ट गांठण्यांत यश मिळविलें होतें. तेव्हांहि असाच भव्य समारंभ करण्यांत आला होता. आणि आज त्यांनीं १५००० अश्वशक्तीचाहि उच्चांक गांटला. आता ही उत्पादन शक्ति दरमहा ३५०० इंजिनांवर नेण्याचाहि श्री. शंतनुरावांचा मनोदय आहे. ही भरभराट होत असतांनाच प्रतापगडावरील भवानीमातेच्या देवळांत विजेचे दिवे लकाकणार आहेत. तसेच कारखान्यांतील सर्व कामगारांना सहपरिवार महाबळेश्वरला सहलीला घेऊन जाण्याचेहि श्री. शंतनुरावांनीं आश्वासन दिलें आहे.

किर्लोस्कर कारखान्यानें किर्लोस्कर इंजिनें परदेशांत निर्यात करण्याच्या बाबतींतहि नेत्रदीपक प्रगति केली आहे. किर्लोस्करचीं इंजिनें भारताशिवाय पूर्व आशिया, आफ्रिका, मध्य अमेरिका, युरोप वगैरे देशांत मोठ्या प्रमाणावर पाठविलीं जात असून ती लोकप्रियहि झाली आहेत. त्यापासून दरवर्षी ६० लाख रुपये परकीय चलन प्राप्त होतें. भविष्यांत किर्लोस्कर ऑईल इंजिन्स प्रा. लि. च्या शाखा परदेशांत उघडण्याचा श्री. किर्लोस्करांचा मनोदय आहे.

ते म्हणाले 'या उद्दिष्टावर न थांबतां मासिक उत्पादन आतां २५००० अश्वशक्तिवर नेण्याचा प्रयत्न प्रत्येकानें केला पाहिजे. ह्या कारखान्यांत जसे १६०० कामगार काम करतात तसेंच आणखी तेवढेच लोक कारखान्याच्या बाहेर कारखान्याच्या कामावर अवलंबून असतात व विक्री वगैरे कामें करीत असतात. म्हणजे कारखान्याच्या वाढीचा फायदा समाजाच्या बऱ्याच लोकांना मिळत असतो.'

एकंदरींत किर्लोस्कर कारखान्यांत अत्यंत अल्पावधींत मोलाची प्रगति केली आहे. भविष्यांतहि अधिकाधिक प्रगति होवो हीच शुभ कामना !



श्री. शंतनुराव किर्लोस्कर व सौ. यमुनाबाई यांच्या हस्तें १५००० अश्वशक्तीचें इंजिन परदेशीं रवाना होत आहे.



अनुक्रमणिका

# ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन

दीपावलीकडे अभिप्रायार्थ. पुस्तकें पाठवितांना नेहमीं २ प्रति पाठवाव्यात म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते.

— संपादक

• जुनेपणांतील नवी सजीवता • आंबट कीं गोड ?
• आशयामागून धावणारे शब्द

## जुनेपणांतील नवी सजीवता

'सिनिक्'च्या कथा हें शीर्षक वाचकांना वरवर कांहींसें गोंधळांत टाकणारें. 'जिब्रानच्या कथा' हें शीर्षक जसें जाणवतें तसेंच 'सिनिक' हें नांव जाणवावें. 'सिनिक्' हें टोपण नांव घेऊन वर्षभर या लेखकानें 'मराठवाड्यां'तून नियमित लेखन केलें. या आपल्या कथा वाचकांना सादर केल्या. आपल्या टोपण नावाबद्दल लेखक प्रारंभी म्हणतात, 'सिनिक्' माझें नांव कांहींना विसंवादी वाटलें. परमेश्वरावर विश्वास नाहीं, मानव्यावर श्रद्धा आहे. बुद्धिवादावर भक्ति आहे पण विज्ञान चेकाळेल ही भीति आहे. जुन्यावर टीका आहे आणि नव्याचें पूर्ण स्वागत नाहीं... पापांत पुण्य दिसतें व पुण्य थोतांड वाटतें...कुणाशींच पटत नाही व अनिष्टाला नष्टप्राय करण्याचें बळ नाहीं. असें असूनहि मान्य कांहींच नाहीं. तेव्हां सिनिकच यथार्थ अन् काय ? 'सिनिक्'च्या एकूण चौवीस कथांचा हा संग्रह नीट बांधणींत व आकर्षक मुखपृष्ठांत मराठवाडा साहित्य परिषदेनें प्रकाशित केला आहे. 'सिनिक्' यांचें बहुतेक जीवन मराठवाड्यांत गेलेलें दिसतें. हैद्राबादी राजवटीपासून तो नंतरच्या पोलीस कारवाईनंतरचा सारा इतिहास त्यांच्या डोळ्यांनीं टिपलेला व बुद्धीनें तीक्ष्णपणें पारखलेला. भावनेला संयमाचा विलक्षण बांध घालून क्वचित् अभावात्मक झालेल्या ह्या कथा एक वेगळंच मराठी जीवन आगळ्या पार्श्वभूमीवर सरळ व सुबोधपणें साकार करतात. या कथांचा प्रकार कोणता ठरवायचा?.. त्यांना लघुकथा म्हणतां येईल कां?..कीं आणखी कोणता कथांचा प्रकार मानायचा ?... तशा त्या कथाच आहेत केवळ. म्हणजे कहाण्या या अर्थानें एक एक कहाणी एक एक जीवनदर्शन देते आणि 'तिचें कार्य संपतें. कुठें शैलीचा नसता अविष्कार नसतो. तंत्राचा बडेजाव नसतो; कलाटणीचा वा कलात्मक कथनाचा हव्यास नसतो. कथा ही कथाच असते व तिचें अवगुंठन कोणत्यातरी एक किंवा अनेक व्यथांभोंवती स्वभाविकपणें झालेलें असतें. त्या दृष्टीने बोकॅशिओ किंवा जिब्रान यांच्या कथांच्या जवळपास या कथा निश्चितच येऊं शकतात. कथेच्या घडणीची प्राथमिक अवस्था या कथांतून जशीच्या तशी टिकून राहिलेली दिसते आणि म्हणूनच कीं काय चटका लावण्याच्या मनस्वी गुणाला यां कथा पारख्या झालेल्या नाहींत.

सिनिक् यांचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन त्यांच्या कथांतून जो उमटतो तो त्यांच्या 'सिनिक्' तत्त्वज्ञानाशीं सहयोग करीतोच असें वाटत नाही. उलट त्यांच्यांतील कलावंत अलिप्ततेनें व निर्विकारपणें कथावस्तूचा विकास घडवून आणतो. पात्रें व्यक्ति म्हणून जशीं जीवनांत वावरतात, तशीच त्यांच्या कथांतून वावरतात. लेखक 'रामस्वामी आणि त्याची बायको' असं शीर्षक आपल्या कथेला देतील. मग कथेला प्रारंभ करतांना शीर्षकाबद्दल सुचणारा दुसरा विचार ते प्रगट करतील. तें शीर्षक लिहून जातील आणि मग आपली कथा सरळसुसंगत बोलकी व सजीव करूं लागतील. कथेचा शेवट सुद्धां करतील, तो प्रारंभीं धरलेल्या एकाच तालांत व सुरांत. मात्र रामस्वामीच्या बायकोचा झालेला कोंडमारा व नंतरचा विलक्षण वृत्तिपालट शेवटच्या एका परिच्छेदांत सांगतील. बराचसा सुचवतील. मला वाटतें हेंच तंत्र थोड्याफार प्रमाणांत सर्व कथांतून उपयोजिलेलें. 'तुळजा' 'मधु बिचारी' 'शिवरामचा प्रश्न' 'डाकू' 'विठ्ठलमामा' 'प्रेम...' सारख्या कथा तुलनात्मक वाचून पहाव्यात. पण कांहीं कथांना कधीं एखाद्या व्यक्तिचित्राचें, तर केंधीं केवळ उत्कट आत्मप्रकटी करणाचें किंवा प्रकट चिंतनाचें आत्मलक्षी स्वरूप प्राप्त होतें. 'उन्नयन' ही 'सर'ची गोष्ट मानावा कीं त्यांचें धारदार जिवंत व्यक्तिचित्रण मानायचें ? मला वि. द. घाट्यांची तेथें आठवण झाली व 'त्यांचे प्रो. देसाई' आठवले. तीच करुणा, तोच दाट व्यक्तिभाव, तोच संयम व चटका लावण्याचा गुण ! 'रेसचे घोडे' तर लघुनिबंधाच्या जवळपास वावरतात. 'गर्दी' ही कथा समृद्धीच्या स्पर्शाने मस्त झालेल्या घारेश्वराचें रंगदार व्यक्तिदर्शन आहे. त्यांतील उपरोध विदारक आहे.

'सिनिकच्या कथा' वाचतांना जें कांहीं जाणवलें हें कांहींशा अशा प्रकारचें. सिनिकच्या कथांतून साकार झालेलें मानवी जीवन हें लोकविलक्षण नसलें तरी सामान्याच्या जीवनातील काहीं असामान्य घटनाची हीं क्षणचित्रें गतिमान व सचेतन अशी रेखाटण्यांत लेखकांनीं यश मिळविलें आहे. मराठवाड्याच्या परिसरातील साहित्याचे विकसन कोणत्या दिशेने चाललें आहे याचा बोधहि या 'कथां'च्या संकलनातून होतो. तिथल्या जीवनाची सखोल व समृद्ध अनुभूति अवीट शैलींतून प्रसन्नपणें देण्याचें सामर्थ्य 'सिनिक यांच्या लेखणींत पुरेपूर आहे. कोणत्याही प्रचलित कथासंप्रदायाला वाहून न घेतां जें उत्कटतेने व बुद्धिनिष्ठतेने त्यांना जाणवलें तें व्यक्त करण्यासाठीं त्यांनीं कथेचा जुनाच सांगाडा नवा प्राण भरून सजीव व सशक्त केला आहे. याचें 'सिनिक'चें श्रेय त्यांना दिलेंच पाहिजे. ही त्यांची सिद्धी त्यांच्या यापुढील 'कथां'ना पण लाभावी व अधिकाधिक 'सिनिक्च्या' कथा'



अनुक्रमणिका

वाचकांपुढें याव्यात असेच या समीक्षकाप्रमाणें वाचकांनाही वाटल्यावांचून राहणार नाहीं.

**सिनिकच्या कथा:** सिनिक्; मराठवाडा साहित्य परिषद्: मूल्य. ३–५०

**—प्रभाकर श्रीधर नेरूरकर**

## आंबट कीं गोड ?

नवनवीन कविता संग्रहांची मराठींत झपाट्यानें भर पडत आहे. त्यांतील कांहीं प्रातिनिधिक ह्या गोंडस नांवानें बाजारांत येतात तर कांहीं सरळ सरळ कवीची नाममुद्रा धारण केलेले आढळतात. प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांत कविता-संग्रहाचा खप इतका मोजका असतो कीं जवळ जवळ नसतो म्हटलें तरी चालेल. कांहीं सन्मान्य अपवाद अर्थातच वेगळावे लागतील. ह्या खपाबाबत कवीलाहि प्रकाशकाइतकेंच ठाऊक असतें. पण तरी कवितेच्या निर्मितीवर किंवा संग्रहप्रकाशनाच्या उत्साहावर ह्याचा मराठींत तरी परिणाम झालेला दिसत नाहीं.

'द्राक्षवेल' हा श्री. सी. पु. वालावलकर ह्या तरुण कवीचा पहिलाच संग्रह. अगदीं अलिकडच्या काळांतच ह्यांच्या कांहीं मोजक्या कविता दुय्यम दर्जाच्या मासिक–साताहिकांतून वाचावयास मिळाल्या. आणि नांवाबद्दल कुतुहल निर्माण होतें न होतें तोंच हा संग्रह बाजारांत आला. संग्रहाला 'वेल' असें अभिधान कांहीं मान्यवर कवींनीहि दिलें आहे. श्री. वि. म. कुलकर्णी यांची 'कमळवेल', श्री. सदानंद रेगे ह्यांची 'अक्षरवेल' आणि ही द्राक्षवेल.

'द्राक्षवेल' मध्यें सगळ्याच कविता अनेकांच्या दाट छायेखालीं वावरतांना आढळतात. त्याचें कारण म्हणजे पहिलेपणा. संग्रह प्रसिद्ध करण्याची अतिशयीत घाई आणि म्हणूनच स्वतःचें सामर्थ्य कवि क्वचितच व्यक्त करूं शकला आहे. पूर्वसुरींचें त्यांतहि करंदीकर, बापट, पाडगांवकर ह्या त्रयींचा दांडगा परिणाम ह्या कवितांवर आढळून येतो.

अंगवळणी पडलेली, लिहायला, गिरवायला सोपी असलेली हलकी फुलकी लय, सरळसोट निःप्रभ विडंबनगीतेंहि ह्यांत अनुस्यूत केलेली आहेत. कधीं कुसुमाग्रजांच्या आवेशाचा आवाका आपलासा करण्याचा प्रयत्नांत कवि गुरफटलेला दिसतो तर केव्हां बापटांच्या मिश्कील शब्दबंधाला बांधण्याची धडपड केलेली आढळते. श्री. विंदा करंदीकर ह्यांच्या वाटदार वाटेवर होणारी दमछाट श्री. वालावलकराना अनुभवण्यास मिळाली असेल तसेंच पाडगांवकरांच्या तरल शैलीनें भारल्यावर शब्दांनी दिलेली हुलकावणीहि त्यांच्या वाट्याला आली असेल

हें सारें जरी असले तरी 'द्राक्षवेल' हा पहिला संग्रह आहे. त्यांतहि कवीच्या सामर्थ्याची चुणूक दाखविणारें कांहीं अर्धस्फुट स्फुलिंग त्यांत निःश्चित सापडतात.

'माझा नागवा हा देह' ही एक संग्रहांतील उत्तम कविता. तिच्यांतील—

'हातीं घेऊन दगड  
पोरें पाठीस लागली  
मारलेल्या दगडांना  
माझी व्यथा समजली...'

ह्या आर्त ओळी अस्वस्थ करतात तर 'एकटा' ह्या कवितेंतील—

'दुःख डोंगराएवढें  
नाहीं सीमेचें बंधन  
वर हिरव्या सुखाचें  
कोठे दिसना वसन.'

ह्यांतील व्यथा फार समर्थपणें प्रकट झाली आहे. 'दुपार' हें शब्दचित्रहि लोभस उतरलें आहे. सगळा संग्रह वाचल्यावर मात्र असें सारखें वाटत रहातें कीं, प्रस्तुत द्राक्षवेल चांगल्या गोड द्राक्षांचें घोस देऊं शकली असती कदाचित् पण घाईमुळें अखेर हा आंबट अहेर वाचकांच्या पदरी पडला.

(**द्राक्षवेल : सी. पु. वालावलकर.** कोंकण वैभव प्रकाशन, मुं. ७ किंमत–१॥ रु.)

**—केशव मेश्राम**

## आशयामागून धांवणारे शब्द

निसर्गकवि म्हणून श्री. मंगेश पाडगांवकर ह्यापूर्वींच विख्यात आहेत. इतरहि विविध भावजीवन त्यांनीं आपल्या कवितेंत हाताळलें असलें तरीहि निसर्ग कवि म्हणूनच ते महाराष्ट्रांत ओळखले जातात. सुक्ष्मांतील सूक्ष्म निसर्ग सौंदर्यें, रहस्यें व विविध रंगीं गुंतागुंत हेरण्यांत त्यांची प्रतिभा सदैव गुंग असतें. त्यांच्या कवितेंत निसर्गाला स्वतंत्र स्थान आहे. निसर्गांतील विविध छटांचा सूक्ष्म आविष्कार सुरेख व रेखीव शब्दांत ते व्यक्त करतात. फारच थोड्या कवींना हा निसर्ग समर्थ शब्दांत सामावतां आलेला आहे. परंतु पाडगांवकरांची प्रतिभा मात्र हे बारकावे आपल्या शब्दांत सहज टिपीत राहाते. आणि सामान्य वाचकाला निसर्गांतील ह्या सौंदर्याचा आस्वाद घ्यायला, त्यांत तल्लीन व्हायला भाग पाडते. 'धारानृत्य' पासून तों ह्या 'उत्सव' पर्यंत श्री. पाडगांवकरांनीं आपल्या प्रतिभेचें विविध दर्शन वाचकांना घडविलें आहे.

आणखीहि एक गोष्ट पाडगांवकरांच्या कवितेंत आढळतें ती म्हणजे आत्मनिष्ठ भावनेची ते करीत असलेली जपणूक. स्वतःच्या मनाला आलेला अनुभव तो अगदीं एकेरी असला तरी त्यांत ते रंगून जातात. त्या अनुभवाचें रहस्य उकलण्याचा प्रयत्न सतत करीत राहातात. त्यांतून जी निर्मिती होते ती प्रामाणिक असते. तिला उत्कटतेची धार असते. कधीं कधीं अत्यंत गूढ अशा मनाला जाणवलेल्या वेदनाहि ते आकारीत असतात. ह्या वेदना आकारीत असतांना, त्यांना शब्दबद्ध करीत असतांना अनेक प्रतिमांचा वापर ते सढळ हातानें करतात. प्रतिमांनीं त्यांची कविता भारावून जाते.

शिवाय वेगवेगळ्या भाववृत्तीहि ते मोठ्या तल्लीनतेनें रंगवितांना आढळतात. हताश मनःस्थिति, विमनस्कता, व्याकुळता, अगतिकता तर कधीं निरागस आनंदाचा एखादा क्षण ते मोठ्या आनंदानें आपल्या काव्यपंक्तींतून टिपीत असतात. मनाचीं हळूवार स्पंदनें, आंदोलनें, शब्दांकित करणें ही थोर कला आहे. त्यांत जसा प्रामाणिकपणा हवा, तसा त्यांत कलात्मक आविष्कारहि हवा, नाहींतर तीच भावना कोरडी, रुक्ष व कळाहिन होते. परंतु पाडगांवकरांसारखें कलावंत त्याहि भावनांत उत्कटतेनें चित्र थरथरवून जातात. भारावून जातात आणि वाचकांच्या अंतर्मनांतील कोमल आणि सुप्त भावनांना थरारून सोडतात. त्यांच्या प्रेमकविताही अशाच नाजुक व सजीव भावना जागवितात. त्यांच्या ह्याच संग्रहातील 'दिवा' हीच कविता पाहा—

ओल्या गवताचा वास येतांना  
अनोळखी पक्षी गीत गातांना  
हळव्या नीजेंत बुडतांन गांव  
माझ्यासाठीं तूं एक दिवा लाव

ह्या कवितेंतील भावना व तिची बांधणीहि अपूर्व आहे. मनाला चटका लावून ही कविता मनांत रुजून राहाते. ह्या कवितेंतील ओळी मनाच्या गाभाऱ्यांत सतत सारख्या घुमत रहातात.







अनुक्रमणिका

आणखीहि कांहीं विविध भावचित्रें, निसर्ग-चित्रें देण्याचा मोह आवरत नाहीं. ती किती रेखीव शब्दांत व्यक्त झाली आहेत पाहा—

दूर दूर
या गवताच्या
हिरव्या ओळीपुढें
तळ्याचा
निळा पूर्ण विराम
(दूर)

झाड पेटले फुलांनीं
फुटे डहाळीला ऊन
झुलणाऱ्या गवतांत
आलें आकाश रुजून
(पांखरूं)

होतो शाप या घराचा
विष फुटते वाऱ्याला
येते भिजलेली कींव
जेव्हां दारीं आसऱ्याला
(घर)

अशा विविध स्पंदनानें भारावलेली श्री. पाडगांवकरांची प्रतिभा वाचकाच्या हृदयाला हात घालते.

पाडगांवकरांचें काव्यनिवेदन अलंकारिक शैलीनें नटलेले असून तें त्यांच्या भावनेशीं सुसंगत असेंच असतें. त्यांच्या काव्यरचनेंत शिथीलता नसतेच परंतु प्रत्येक शब्द तोलामोलाचा असतो. उगीचच फुकटफाकट शब्दांची भर त्यांच्या रचनेंत आढळत नाहीं. कांहीं वेळा नीट नेमका भावार्थ व्यक्त करतां आला नाहीं कीं, मग शब्दांची ओढाताण सुरूं होते. परंतु पाडगांवकरांसारखे समर्थ कलावंत असले कीं त्यांच्या आशयामागून शब्द धांवत येतात. शिवाय चमत्कृतिपूर्ण रूपेंहि पाडगांवकर केव्हां केव्हां मोठ्या खुबीनें वापरतात. सहज चपखलपणें व अगदीं न बावरतां हीं रुपें आपली जागा घेता.

पाडगांवकर नेहमीं काव्यरचनेचें नवेनवे प्रयोग करीत आलेले आहेत. कवितेच्या रचनेंत नित्य नवे प्रयोग करीत राहणें ही मोठी साधना आहे. तपस्या आहे. पाडगांवकरांसारखें साधक कलावंत ही तपश्चर्या सातत्यानें करीत राहतात. अजुनहि नवनवे प्रयोग हाताळण्यांतील त्यांचा उत्साह पाहिला कीं मन कौतुकानें व आदरानें भारावून जातें. पाडगांवकरांच्या सामर्थ्यानें प्रेरित-झालेले आज पुष्कळसे नवे कवि त्यांचें अनुकरण करण्यांत भूषण मानीत आहे तेंहि उगीचच नव्हे.

**उत्सवः**कवि मंगेश पाडगांवकर, प्रकाशक पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. किं. ४६

**—नारायण सुर्वे**

## पॉप्युलरची बालवाडी

खास बालवाचकांसाठीं म्हणून हल्लीं बरीचशीं पुस्तकें निघूं लागलीं आहेत. पण त्यांतील बालकांना पचणारें रुचकर साहित्य फार कमी असतें. तरीपण एकंदरींत बालकांची अभिरुचीं लक्षांत घेऊन पॉप्युलर प्रकाशननेंहि नवें बाल वाङ्मय प्रकाशित केलें आहे.

सौ. निर्मला देशपांडे यांचा बालगीतांचा संग्रह '**चिव चिव चिमणी**' मुलांना आवडण्यासारखा आहे. चिमणी, कावळा, पोपट, चेंडू व लहान मुलं असा परिचयाचाच पण मुलांच्या आवडीचा विषय त्यांनीं हाताळला आहे. कल्पकता, रंजकता व सुबोधता यामुळें तो अधिक वाचनीय झाला आहे.

या बाल वाङ्मयापैकीं '**झिपऱ्या व रत्नी**' हे श्री. शंकर सारडा यांचें गोष्टीचें पुस्तक तर मुलेंच काय पण मोठीं माणसें सुद्धां मिटक्या मारीत वाचतील इतकें सुंदर लिहिलें आहे. कोंबडा व कोंबडी हा कथा विषय. पण ती कथा वाचतांना राजाराणीचीच गोष्ट वाचीत असल्याचा भास होतो खरा. पुस्तक कल्पकतेचें गमक आहे.

अल्लाउद्दीन व जादूचा दिवा हाच कथाभाग पण अर्धवट राक्षसाचा आधार घेऊन लिहिलेलें '**निम्मा शिम्मा राक्षस**' हें बालनाट्यहि चांगलें आहे. अर्धवटपणामुळें राक्षसाची झालेली फजिती व त्यांतून निर्माण झालेला विनोद श्री. रत्नाकर मतकरी यांनीं कल्पकतेनें वेंचला आहे.

आशा गवाणकर यांचा '**जादूचा दिवा**' हा गींस संग्रह व 'महावीराची गोष्ट' हे श्री. विलास सांगवे यांचे पुस्तकहि बरें आहे.

पॉप्युलरचे हे बालवाङ्मय रंगीत छपाई सजावट व साहित्याचा दृष्टीने वाचनीय आहे. कागदहि उत्तम वापरला आहे. मात्र बालवाङमयाच्या दृष्टीनें पुस्तकांची किंमत प्रौढ वाङ्मयाइतकी जड वाटते.

[ वरील पांच पुस्तकें—प्रकाशक–पाप्युलर प्रकाशन, ताडदेव, मुंबई ]

**—मधुकर कोसारे**

## 'दीपावली बुद्धिबळा'संबंधी खुलासा

दीपावलीच्या गेल्या सप्टेंबर अंकापासून आमच्या असंख्य वाचकांची ज्ञानसंपदा व शब्दसंचय वाढीस लागावा म्हणून 'दीपावली बुद्धिबळाचा' एक अभिनव प्रयोग केला आणि अपेक्षेपेक्षां आमच्या शेंकडों वाचकांनीं त्याचें जास्तच स्वागत केलें. 'दीपावली बुद्धिबळा'ची कसोटी म्हणून असंख्य वाचकांनीं शेंकडोंच्या संख्येनें बुद्धिबळ भरून पाठविलें. त्यापैकीं कांहींचें तर कौतुक करावेंसें वाटतें. परंतु याहिपेक्षां अधिक वाचकांनीं 'दीपावली बुद्धिबळांत' भाग घ्यावा अशी आमची अपेक्षा आहे.

बहुतेशीं वाचकांनीं तर आम्हांला स्पष्टपणें सूचना केल्या आहेत कीं, पांच भाग्यवान बिनचूक विजेत्यांना जीं रोख बक्षिसें देण्याची योजना आहे, ती रोख न पाठविता त्यांना वर्षभर दीपावलीचे वर्गणीदार म्हणून करून घ्यावें. वाचकांची ही सूचना कोणालाहि स्वागतार्हच वाटेल. म्हणून आम्ही यापुढें त्या **पांच बिनचूक विजेत्यांना वर्षभर दीपावली भेट** म्हणून पाठविण्याचा निर्णय घेत आहोंत.

वस्तुत: दीपावली बुद्धिबळ क्र. १ चें उत्तर वार्षिक अंकांतच द्यायला हवें होतें. पण कांहीं तांत्रिक अडचणीमुळें तें शक्य झालें नाहीं म्हणून या अंकांत त्याचें उत्तर देत आहोंत. वाचक खुल्या दिलानें क्षमा करतीलच.

**दीपावली बुद्धिबळ क्र. १ चें अचूक उत्तर**

**आडवे शब्द**:— (१) छत्तीसाचा आंकडा (५) ढोर (६) कळकळ (८) दगड (९) धनकुबेर (१०) संदूक (१३) खांडेकर (१४) लव (१५) गो. ग. आगरकर.

**उभे शब्द**:—(१) छकडा (२) साधकबाधक (३) कणिका (४) घोरपड (७) नकुल (८) दरवडेखोर (१०) संचलन (११) करभार (१२) मातंग

'**दीपावली बुद्धिबळ क्र. २** शेवटच्या पानावर दिलेलें आहे.

अनुक्रमणिका







दीपावली बुद्धिबळ क्र. २



"दीपावली बुद्धिवळाचे" नियम व अटी मला मान्य आहेत.

स्पर्धकाचें नांव ______________________

पूर्ण पत्ता : ______________________

## दीपावली बुद्धिबळ क्र. २

.....येथें कापा.....

### आडवे शब्द—

१ रागाचें फाजील भाषण.
५ अनेक
६ सरकारी देणें
८ दया
१० धक्का
१२ मुसलमानांचें पवित्र स्थान
१३ उणीव
१५ टिकाव
१९ दैवी राग
२० अनेक जातींचीं फळें

### उभे शब्द—

२ पांघरूण
३ शिवनृत्य
४ डौल–ऐट
५ दृष्यकाव्य
७ समुद्र
८ शिस्तीनें वागण्याचें शिक्षण
९ गुरू
१० लाकडी तलवार

**उत्तरें पाठवावयाची शेवटची तारीख**

**१५ नोव्हेंबर १९६३**

**अधिकृत उत्तर–पुढील अंकांत**

### स्पर्धकांकरितां नियम व अटी—

१. ही स्पर्धा निःशुल्क आहे.

२. ह्या स्पर्धेत कोणालाहि भाग घेता येईल.

३. स्पर्धेकरितां पाठविण्यांत येणारीं उत्तरें ह्याच पानावर छापलेल्या **चौकोनी कुपनांत** भरलेलीं असावीत. कूपनावर नांव व पत्ता लिहिणें आवश्यक आहे. **अन्यथा तीं विचारांत घेतलीं जाणार नाहींत.**
उत्तरें **'दीपावली बुद्धिवळ,'** संपादक, '**दीपावली**', दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई–४ या पत्यावर पाठवावींत.

५. ह्या स्पर्धेकरितां आलेल्या अचूक उत्तरांतून ती **लॉट पद्धतीनें काढून** ज्यांचें उत्तर आमच्या उत्तराशीं बिनचूक असेल, अशा **पहिल्या पांच भाग्यवान विजेत्यांना** दीपावलीचा **वार्षिक वर्गणीदार** करण्यांत होईल व त्यांना वर्षभर दीपावली भेट म्हणून पाठविण्यांत येईल.

६. एकावेळीं एकाच स्पर्धकास फक्त एकच चौकोन पाठविता येईल.

७. स्पर्धेबाबत संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल. त्याबाबत कसलाहि **पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.**

८. उत्तरें पाठवावयाची अंतिम तारीख १५ नोव्हेंबर १९६३ ही आहे. नंतर येणाऱ्या उत्तरांचा विचार होणार नाहीं. उत्तर पुढील अंकांत प्रसिद्ध केलें जाईल.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



